# अंक ४.

## एप्रील सन १८६३

### विषयांचीअनुक्रमणिका.



---

## सूचना.

स्कंदपुराणांतर्गत श्रीवेदव्यासकृत सह्याद्रीखंड आहे त्यांत ब्रह्मांडो त्पत्ती, संहार, सृष्टिक्रम, धर्मोपदेश, [illegible] विधी, आन्हिक, शर्ती, [illegible] आणि [illegible] वर्णोत्पत्ती कथा, गोमांचल वर्णन, स्वामिगिरीवर्णन, परब्रह्म [illegible] वर्णन, [illegible] महात्म्य, सहस्त्रार्जुनाख्यान, तुळजामहात्म्य, एकवीराख्यान, रेणुका महात्म्य, हरिहरेश्वर महात्म्य, मंगेश महात्म्य, शांतादुर्गामहात्म्य, [illegible] महात्म्य, रामकोटीश्वर वर्णन, अशीं सुमारें १०० हून अधीक प्रकरणें आहेत. हीं सर्व देवस्थानें, वर्णोत्पत्ती कथा, त्या सह्याद्री पर्वतावर व त्याच्या [illegible]; याचे अध्याय सुमारें ३०० शांवर आहेत. याचे श्लोक सुमारें १४००० पर्यंत होतील. ग्रंथ मिळावयास दीर्घ प्रयत्न लागला. हा ग्रंथ आतां विद्वज्जनांचे सहाय्यानें शुद्ध होत आहे तो पुढें थोड्या दिवसांनी तयार झाल्यावर, शिळा छापें छापून जाईल. हा ग्रंथ ज्यांस पाहिजे असेल त्यांणीं पत्र द्वारें आपला नीट पत्ता लिहून रा० रा० आत्माराम सगुण आणि कंपनी यांस काळबादेवीच्या रस्त्यावर अथवा आम्हांस कळवावें म्हणजे हा ग्रंथ तयार झाल्यावर त्यांस पाठविला जाईल. किंमतीच्या [illegible] जाहिरात मागाहून दिल्ही जाईल, परंतु प्रथम सही करणारांस दर प्रतीस रुपये ६ पर्यंत व मागाहून घेणारांस जास्ती पडतील.

माधवचंद्रोबा.<br>
सर्वसंग्रहाचे मालक.

# नामदेवकृतअभंग

## बाळक्रीडा.



लंबोदरा तुझा शोभे शुंडा दंड करितसे खंड दुश्चिन्हांचा १
चतुर्भुज आयुधें शोभताति हातीं भक्तांला रक्षिती निरंतर २
भव्य रूप तुझें उंदिर-वहना नमन चरणा करितसें ३
नाम घेतां तुझें दोष जळताती कळीकाळ कांपति तुझ्या नामें
चौदा-विद्या तुझ्या कृपेनें येतील मुके बोलतील वेद घोष ५
रुणझुण पायीं वाजताती वाळे देखोनियां भुले मन माझें ६
भक्त-वत्सला तूं पार्वती-नंदना मस्तक चरणा ठेवीतसें ७
नामा ह्मणे आतां देई मज स्फूर्ती वर्णितसें कीर्ती कृष्णाजीची

१

सरस्वतीमाते द्यावी मज स्फूर्ती येतों काकूलती तुज-लागीं १
लाडकें लडिवाळ मागतसें तुज वंदीतसें रज चरणाचे २
त्वरें येऊनियां शीरीं ठेवी हात जाईल हे भ्रांत तेव्हां माझी ३
आपुल्या बाळाशी धरीं आतां हातीं न करीं फजिती जना-मध्यें ४
विश्वासा जो हरी त्याची वर्णूं कीर्ती आवडिचा वोतीं रस माये ५
एकोनियां स्तव झालीसे प्रसन्न नाम्याचा अभीमान मज-लागीं ६

२

प्रल्हाद नारद पराशर पुंडरीक व्यास आणि वाल्मीक नमीयेले १

...ना...ध्म अंबर्षी शौनक ब्रम्हनिष्ट शुक नमियेल २
वि...क्मांगदाऽर्जुन वसिष्ठ बिभीषण केलेसे नमन तयां-लागीं ३
टीकाकार श्रीधर बाहिरंभट चतूर करा निरंतर कृपा मज ४
साधु संत सिद्ध शिरीं ठेवा हात वर्णीन समस्त कृष्णा-लीला ५
नामा आठवीतो खेचर-चरण तयाच्या कृपेन सिद्धि जावो ६

३

देवा आदि देवा सर्वत्रांच्या जीवा ऐक वासुदेवा दयानिधे १
ब्रम्हा आणि इंद्रा वंद्य सदाशिवा ऐक वासुदेवा दयानिधे २
चौदा-लोक-पाळ करीति तुझी सेवा ऐक वासुदेवा दयानिधे ३
योगीयांचेध्यानी आतुडसी देवा ऐक वासुदेवा दयानिधे ४
निर्गुण निराकार नाहीं तुज माया ऐक कृष्णा-राया कानडिया ५
करुणापर्जन्याच्या सिंपी मावरि तोया ऐक कृष्णा-राया गोजरीया ६
नामा म्हणे जरीदारवधिसी पाया तरीवदावया स्फूर्ति चाले ७

४

क्षीर-सागरांत असशी[1] बैसला धांवोनि मजला भेट देई १
शेषा-वरी जरी असशी निजला धांवोनि मजला भेट देई २
कैलासीचा शिव पूजितो तुजला धांवोनि मजला भेट देई ३
गहिवरोनी नामा बाहातो[2] विठ्ठला धांवोनि मजला भेट देई ४

५

चक्रवाक-पक्षी वियोगें बाहाती झालें मज प्रती तसें आतां १
चूकलिया माय बालकें रडती झालें मज प्रती तसें आतां २

[1] असती, [2] बोलावी.

वत्स न देखतां गाया हुंबरती झालें मजप्रती तैसें आतां ३
जीवना वेगळे मच्छ तळमळती झालें मजप्रती तैसें आतां ४
नामा म्हणे मज ऐसें वाटे चित्तीं करितसें खंती फार तुझी ५

६

काय माझा आतां पहातोसी अंत येईं बा धांवत देवराया १
माझ्या जिवा होय तुजविण आकांत येईं बा धांवत देवराया २
असे जरी काम भेटुनि जाय मातें येईं बा धांवत देवराया ३
येरे येरे देवा नामा तुज वाहात येईं बा धांवत देवराया ४

७

न वर्णवे वाचे जन्म मरण दुःख दावीं आतां मुख पांडुरंगा १
कुरळ केश भाळीं शोभतो टीलक दावीं आतां मुख पांडुरंगा २
भोंवया[1] व्यंकटा शोभती सरेख दावीं आतां मुख पांडुरंगा ३
कमलाऽकार नेत्र सुंदर नासिक दावीं आतां मुख पांडुरंगा ४
कर्णीचीं कुंडलें न वर्णवे हाटेक दावीं आतां मुख पांडुरंगा ५
अधर आरक्त दंत चंद्राऽधिक दावीं आतां मुख पांडुरंगा ६
विष्णुदास नामा तुझेंचि बालक दावीं आतां मुख पांडुरंगा ७

८

बाहु-बळें तुवां काढिलें अमृत ठेवीं बा तो हात शिरावरी १
जननी माझी जेव्हां ज्याकडे पाहतें ठेवीं बा तो हात शिरावरी २
देवां बैसवोनी सुधेतें वाढीत ठेवीं बा तो हात शिरावरी ३
क्षीराचा सागर उपमन्युसी देत ठेवीं बा तो हात शिरावरी ४

---

१ भव्य, २ सुवर्णाचीं.

घेउनियां चक्र परिक्षिती [illegible]सन ठेवीं बा तो हात शिरा-वरी ५
कवटाळिलें जेव्हां ध्रुवा[illegible] वनांत ठेवीं बा तो हात शिरा-वरी ६
विदूराच्या घरीं कणिया[illegible]भक्षित ठेवीं बा तो हात शिरा-वरी
चिरंजीव करुनीया नग[illegible]तें देत ठेवीं बा तो हात शिरा-वरी ८
नामा म्हणे युद्धीं रक्षियेला पार्थ ठेवीं बा तो हात शिरा-वरी ९

९

रुण-झुण रुण-झुण वाजताती वाळे दावीं तीं पाउलें दयानिधे १
जनक-श्रुतदेव यांच्या घरां गेले दावीं तीं पाउलें दयानिधे २
धरियेलें नक्रें तेव्हां जे धांवले दावीं तीं पाउलें दयानिधे ३
वस्त्र-हरणीं द्रौपदीनें जे चिंतिले दावीं तीं पाउलें दयानिधे ४
देखोनियां ज्यातें कौरव भिहाले[1] दावीं तीं पाउलें दयानिधे ५
धर्म आणि भीष्म विदुराऽदिक धाले दावीं तीं पाउलें दयानिधे ६
सैंवरासि जातां शिळे उद्धारिलें दावीं तीं पाउलें दयानिधे ७
नामा म्हणे ज्यातें बळीनें पूजिलें दावीं तीं पाउलें दयानिधे ८

१०

अडखळोनी पडसी घालूं नको जोडा धांवत दुडदुडा येई आतां १
बैसावया-साठीं घेऊं नको घोडा धांवत दुडदुडा येई आतां २
भोजना बैससी येथें घेई वीडा धांवत दुडदुडा येई आतां ३
बाहुबळें काढीला देवांचा जो खोडा धांवत दुडदुडा येई आतां ४
नामा म्हणे रक्षीं लक्ष्मीचा चूडा धांवत दुडदुडा येई आतां ५

११

---

१ भ्याले.

# अभंग.

येरे येरे देवा देईन तुम्हा पेडा  त्याला बाहे वेडा ना.
ज्याचे पायीं असे बिरुदाचा तोडा  त्याला बाहे दे  ४
जन पुसे सुखी रखुमाईचा जोडा  त्याला बाहे दे
यावयासी येथें आळस तुम्ही सोडा  घेइन इडा-प  ५

१२

युगा ऐसें पळ तुज-वीण जाय  पाहातोसी काय  ६
कोमळ हृदय तुझें पंढरीच्या राया  कठीण सखय
विचारिलें चित्तीं दुर्लभ हरि-हरा  कैसा जाऊं घर  ७
अंगीकाराअंती अव्हेरांची मात  नोहे हें उचित देवराया  ४
मागें जे जे आळी केली वासुदेवा  उदारा केशवा पूरविली  ५
तुपेक्षेसी चित्तीं ऐसा हा भरवंसा  दिसोनी निराशा झाली आतां
वांचोनियां दुःख भोगावें रे आतां  प्राणासी मुकतां तेंचि भलें ७
वर्णितां तो नामा झाला समाधिस्थ  जाहलें विदीत पांडुरंगा ८

१३

खरें धांवोनियां आलासे गोविंद  सावध सावध नामदेवा  १
रुसलासे नामा देवासी न बोले  करें कुरवाळिलें वदन तेव्हां २
समजावोनि देवें धरिला पोटासीं  बोल रे मजसीं नाम देवा ३
नामा म्हणे देवा उसीर कां केला  किंवा माझा आला तुला राग ४

१४

वेळो-वेळां तूला बाहे वेडा भक्त  राहो नेदी निवांत क्षण-भरी १
मागें बहुतानी केले रे प्रबंध  पाहोनियां छंद वेडावलों  २

---

१ बिदावळी. २ अंगीकारल्यावर. ३ टाकण्याची, ४ हट्ट.

ान विश्वाच्या जो बाप वर्णि रे प्रताप नामदेवा ३

१५

म सांगेल जो कथा श्रवण करितां उद्धरती १
र्थीं स्नान जे करीती त्याचे उद्धरती पूर्वज ते २
स्नाना श्रम लागे फार करावें एकाग्र मन येथें ३
सें बोले भागवत श्रीशुक सांगत परिक्षीती ४

१६

त्क दैत्य ते मातले धरणीसी झालें बोझें त्यांचें १
दिधलासे त्रास ऋषी-मुनी-सर्वां न पूजिती देवा कोण्ही तेव्हां २
राहियेले यज्ञ मोडिलीं कीर्तनें पळाले ब्राम्हण दैत्या-भेणें ३
वत्स-रूपी पृथ्वी ब्रम्ह्या-पासीं जाय नेत्रीं वाहे तोय सांगतसे ४
बुडवीला धर्म अधर्म झाला फार सोसवेना भार मज आतां ५
ब्रम्हा इंद्र आणि बरोबरी शिव चालियेले सर्व क्षीराब्धिसीं ६
नामा म्हणे आतां करितील स्तुती सावधान-चित्तीं परिसावें ७

१७

वासुदेवा हृषीकेशा माधवा मधुसूदना
करिताती स्तवना पुरुष सूक्तें १
पद्मनाभा त्रि-लोके-शा वामना जलशाई
आम्हा कोण्ही नाहीं तूज-वीण २
जनार्दन हरि श्रीवत्स गरुड-ध्वजा
पाव अधोक्षजा आतां आम्हां ३

---

१ उदक.

अभंग.

वराहा पुंडरीका नरसिंहा नरांतका[1]
वैकुंठ-नायका देवराया ४
अच्युता शाश्वता अनंता अव्ययां
कृपेच्या अभया देई आम्हां ५
नारायणा-ध्वस्ता कैठभ भंजना
करीं रे मर्दना दुष्टांचिया ६
चक्र-गदा-शंख-पाणी नरो-त्तमा
पाव पुरुषोत्तमा दासा तुझ्या ७
रामा हयग्रीवा भीमा रौद्रोद्भवा
आश्रय भूतां-सर्वा तुझा असे ८
श्रीधरा श्रीपति चतुर्बाहो मेघश्यामा
लेंकुरें तुझीं आम्हां पावसरें ९
नामा म्हणे ऐसें करितां स्तवन
तोषला भगवान क्षीर-ब्धींत १०

१८

आकाश-वाणी होय सांगे सकळांसी
तळमळ मानसीं करूं नका १
देवकीच्या गर्भी येईल भगवान
रक्षील ब्राम्हण गाई भक्त २
उतरील भार मारील दैत्यांसी
आनंद सर्वांसी करील तो ३

---

१ नर-अंतका.

रोहिणीचे उदरीं शेष-बळीभद्र
यादव समग्र व्हारे तुम्ही
ऐकोनीयां ऐसें आनंद मानसीं
येती स्वस्थळासीं नामा म्हणे ५

१९

शेषा-प्रति बोले लक्ष्मीचा वर
चला अवतार घेऊं आतां १
पृथ्वी-वरी दैत्य माजले ते फार
गार्‍हाणें सुरवर सांगू आले २
शेष म्हणे मज-श्रम झाले फार
या-लागीं अवतार मी न घेची ३
राम-अवतारीं मी झालों लक्ष्मण
सेविलें अरण्य तुम्हां-सवें ४
चौदा वर्षे-वरी केलें उपोषण
जाणतां आपण प्रत्यक्ष हें ५
नामा म्हणे ऐसें वदे धरणी-धर[1]
हांसोनी श्रीधर काय बोले ६

२०

पूर्वीं तूं अनुज झालासी कनिष्ठ
सोसियेले कष्ट मज-सवें १
आतां तूं वडील होईं गा सर्वज्ञा

[1] शेष.

अभंग.

पाळीन मी आज्ञा तुझी बारे
देवकी-उदरीं राहावें जावोनी
मायेसी मागूनी पाठविनों 3
योग-माया तूज काढील तेथून
घालील नेऊन गोकुळासीं 4
लक्ष्मीसी सांगे तेव्हां हृषीकेशी
कौंडिण्य-पुरासीं जावें तुम्ही 5
नामा म्हणे ऐसा करूनी विचार
घ्यावया अवतार सिद्ध असे 6

२१

वसुदेवा देत देवकी बहीण
लग्ना-मध्यें विघ्न झालें ऐका 1
आकाशाची वाणी सांगतसे कंसा
मानी हा भरंवसा बोलण्याचा 2
आठवा जो पुत्र वधील तुजसी
ऐकोनी मानसीं क्रोधावला 3
घेउनियां खड्ग माराया धांवला
हात तो धरिला वसुदेवें 4
देईन मी पुत्र सत्य माझें मानीं
ठेवा बंदी-खानीं दूता सांगे 5
पुण्य सरावया पेटे देवऋषी[1]

---
1 नारद.

वधीं बाळकांसी ठेऊं नको ६

होतांची प्रसूत नेवोनियां देत
साहाही मारित दुराचारी ७
धन्य त्याचें ज्ञान न करीच शोक
वधीनां बाळक नामा म्हणे ८

२२

सातवा जो गर्भ योग-माया नेत
आश्चर्य करीत मना माजी १
रोहिणी-उदरीं नेवोनी घातला
नकळे कोणाला देवा-वीण २
कंसाचिया भेणें यादव पळाले
ब्राम्हण राहीले अरण्यांत ३
नाहीं कोण्हा सुख तळमळ मानसीं
वधील दुष्टासी कोण आतां ४
विश्वाचा जो आत्मा कळलें नयाला
दावितसे लीळा संभूतीची ५
अहर्निशीं सुख भक्ताचे मानसीं
स्थापील धर्मासी नामा म्हणे ६

२३

देवकीचें तेज दिसे जसा सूर्य
कंसाचें हृदय जळतसे १
हरणें पळती देखोनियां व्याघ्र

कांपे थरथर तया-परी २
अज्या-सर्प-न्यायें कीटक भ्रमर
दिसती नारी-नर कृष्ण-रूप ३
जेवितां बोलतां सेजेसीं तो निज
आला आला मज मारावया ४
नासील हा आतां दैत्याचें तें बंड
फाटलिसे गांड तेव्हां त्याची ५
नामा म्हणे भयें लागलेंसे ध्यान
चरा-चरीं कृष्ण दीसतसे ६

२४

विमानाची दाटी अंतरिक्ष देव
करिताती सर्व गर्भस्तुती १
मंत्रा-अक्षरांत असे तुझी मूर्ती
यज्ञे-शा तुजप्रती नमो नमो २
साजणे मांडुती नवेजणी स्थापिती
न कळे कोणाप्रती अंत तुझा ३
अठराजण तुझी वर्णिताति कीर्ती
गुणा-तीता श्रीपती नमो तुज ४
चौघांजणा तुझा न कळेची पार

---

१ यज्ञकांडांत जे १७ अक्षरांचे पांच मंत्र सांगितले आहेत त्यांत श्रीनारायणमूर्ति आहे, २ साहाशास्त्रें, ३ श्रवण, कीर्तन, नामस्मरण, पादसेवन, आर्चन, वंदन, दास्य, सख्य, आत्मनिवेदन, अज्ञानविविधाभक्ती, ४ अष्टादशपुराणें, ५ चतुर्वेद. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि अथर्वणवेद ह्यांस.

अमरसी व. -वार आम्हा-साठीं ५

अष्ट्यांसी सहस्त्र वर्णिताती तुज
ब्रम्हांडाचें बीज तूज नमो ६

जन्म मरणाचें नाहीं तया भय
आठविती पाय तुझे जेकां ७

नवजणी तुझ्या पायीं लोळताती
परब्रम्ह मूर्ती तूज नमो ८

नामा म्हणे ऐसी करिताती स्तुती
पुष्पें वाहुनि जाती स्व स्थळासीं ९

२५

मयूरादि पक्षी नृत्य करीताती
नद्या वाहताती दोही थडीं १

भूमीवरी सडे केशर कस्तुरी
आनंद अंतरीं सकळांच्या २

विमानाची दाटी सुरवर येती
गंधर्व गाताती सप्त-स्वरें ३

मंद मंद मेघ गर्जना करीती
वाद्यें वाजताती नाना-परी ४

नामा म्हणे स्वर्गीं नगारे वाजती

१ नवनिधी, (महापद्म, पद्म, शंख, मकर, कछप, मुकुंद, कुंद, नील, खर्व, ह्या नवनिधी.

अप्सरा नाचती आनंदानें ५

२६

दशरथें मारीला तोचि होता मास
वर्षा ऋतुवास कृष्ण-पक्ष १
वसु नाम तिथी बुधवार असे
शुक सांगतसे परीक्षिती २
रोहिणी नक्षत्र दोन प्रहर रात्र
माया घाली अस्त्र रक्षपाळां ३
नव ग्रह अनुकूळ सर्वांचें जें मूळ
वसुदेव-कपाळ धन्य धन्य ४
जयाचा हा वंश तयासी आनंद
माझ्या कुळीं गोविंद अवतरला ५
अयोनी-संभव नोहे कांहीं श्रमी
नाम-याचा स्वामी प्रगटला ६

२७

कोटीशा आदित्य गोठे एके-ठायीं
तेजें दिशा दाही उजळल्या १
घाबरा होवोनी वसुदेव पाहे
हृदयीं आश्चर्य करीतसे २
मुगुटांवरी रत्नें नक्षत्रांचा मेळा

१ दशरथानें श्रावणास मारिलें आहे तेव्हां तो मास म्हणजे श्रावणमहिना;
२ वसु-म्हणजे आठ तेव्हां अष्टमी.

भाळीं शोभे टीळा केशराचा ३
व्यंकटा भ्रुकुटी कमळाऽकार नेत्र
नासिक विचित्र शुक-चुंचू ४
विद्युल्लते-परि झळकती कुंडलें
अधर कोवळे अरुणोदय ५
कंबुग्रीव-कंठ हृदयीं वत्स-लांछन
ब्रम्हयासी सीण नकळे अंत ६
चतु-र्भुज शंख चक्र गदा पद्म
चिमणा मेघ-श्याम वर्ण ज्याचा ७
कौस्तुभ निर्मळ वैजयंती माळा
कासे सोनसळा हाटक-वर्ण ८
रुण झुण रुण झुण वाजताती वाळे
आरक्त वर्तुळ नखीं शोभा ९
ध्वज वज्रांऽकुश जैसीं रातोत्पळें
नामा म्हणे डोळे दीपताती १०

२८

अयुत गाई ब्राम्हणासीं सोडी संकल्प मानसीं १
बोळखिलें तुज आतां कळलासी मज २
धर्म स्थापावया येथें येसी देव-राया ३
आलिंगितां दोहीं-बाहीं नामा म्हणे डोई पायीं ४

२९

१ धनुष्यासारिख्या, २ अरुणोदयाच्या रंगाप्रमाणें असा भाव, ३ शंखासारखी मान वगळा, ४ सुवर्णवर्ण, ५ लाल कमळें.

सोडा सोडा मिठी लपवा लपवा जग-जेठी १
म्हणी कंसासी कळेल माझ्या बाळासी मारील २
वसुदेवा चिंता मनीं तेज न माय गगनीं ३
नामा म्हणे आलें हसें देव तेव्हां सांगतसे ४

३०

नंदाच्या घराला मज नेई गोकुळाला १
माया उपजली तेथें ठेवी मज आणा तीतें २
म्हणासी रक्षपाळ ते म्यां मोहिले सकळ ३
आच्छादित रूप नामा म्हणे माझा बाप ४

३१

उचलिला कमळा-पती पायिंचीं बंधनें गळती १
त्रैलोक्यांत जो न माय त्यासी बंधन करील काय २
कवाडें तीं उघडती देखनांचि देवाप्रती ३
मंद मंद पडे पाउस शिरीं छाया करी शेष ४
पुर चालला अन्वाट त्यासि लाविला अंगुष्ठ ५
त्वरें आला नंदा-घरीं निद्रिस्थ त्या नर नारी ६
ठेवी तेथें कृष्णजीला माया घेउनी निघाला ७
रडे माया करी आक्रांत नामा म्हणे उठवी दूत ८

३२

पूर्ण-ब्रम्ह मानीं कंसाच्या भयासीं
वाटेल मानसीं कोणाचिया १
इच्छामात्रें करी सृष्टीचा प्रळय

त्यासीं असे भय कवणाचें २
नंदाचें सुकृत झालें अगणित
म्हणोनी भगवंत आला तेथें ३
सर्वा होय सुख नरतील लोक
नामा म्हणे शुक सांगतसे ४

३३

नारदिनें जानी कंसा सेवक सांगती १
उपजला वैरी त्यासी तूरे त्वरें मारीं २
त्वरें धांव घाली पाहे कन्या उपजली ३
ज्याचा धाक तुज नव्हे कन्या द्यावी मज ४
मारायासीं खड्ग घाली हातिची निष्टुनियां गेली ५
तुजलागीं वधी उपजला मज आधीं ६
सांगे ब्रम्ह-ज्ञान देवकीचें समाधान ७
नामा म्हणे तयेवेळीं त्यांचीं बंधनें काढिलीं ८

३४

बोलावोनी अवघीयांतें कंस पाहे विचारातें १
कोण्ही एकरे बोलती आम्हा ठावी देव-वस्ती २
जेथें पुराण कीर्त्तन ब्राम्हणादि करिती यज्ञ ३
तेथें असे नारायण वधूं तयासी जाउन ४
वैरी सहजची मरेल ऐसे बोलताती बोल ५
कंसा मानवलें जाण करा मजसाठी यत्न ६

---

१ पुण्य, २ वसुदेव देवकीचीं.

नामयाचा छंद नंद करीतो आनंद ७

३५

शुक म्हणे राया ऐक परिक्षिती
श्रवण करितां तृप्ती नाहीं तुज १
माया जातां मथुरे सावध निद्रिस्थ
देखीला भगवंत येशोदेनें २
अनंत ब्रम्हांडें उदरीं न कळे कोणाला
वाजविती थाळा जन्म-काळीं ३
यज्ञ-भोक्ता कृष्ण त्यासी देती बोळा
ध्यानीं ध्याय भोळा सदा-शिव ४
गोकुळी आहाती नंदालागीं तेव्हां
पुत्र-मुख पाहा नामा म्हणे ५

३६,

विश्वाचा जो बाप हातीं ज्याच्या सूत्र
म्हणविती पुत्र नंदजीच्या १
तीर्थें ज्याच्या चरणीं करिताती न्हाणी
येशोदा जननी म्हणताती २
केडावला शेष सिणले वेद चारी
निजे मांडि-वरी येशोदेच्या ३
शरणागता देत क्षीर सिंधू दान

१ बोयी, चिरटोळी, २ बोलाविती.

चोरवीनसे रत्तन आवडीनें ४
त्रैलोक्याचा राजा वर्णू काय रंक
ऐंकावें जानक नामा म्हणे ५

३७

करुनियां स्नान वस्त्रें घेतलीं नूतन १
पाचारा ब्राम्हण शृंगारावें देवसदन २
बाहा बाहा दश-ग्रंथी त्यांसि सांगा आणा पोथी ३
वरें बाहा रे ज्योतिषी नंद करी ज्यानकारसी ४
केलें देवत-आर्चन द्विज सांगती नर्मण ५
फार त्याला झालें सुख पाहे कृष्णाजीचें मुख ६
करी पुण्याह वाचन नामा म्हणे आनंदान ७

३८

आला जगदो-द्वार त्याचें भरलें भांडार १
सुशोभित दिसे मही दोन लक्ष दिधल्या गाई २
तिळ तांदूळ पर्वत द्रव्यें वांटी अगणीत ३
एक जाती एक येती वोझें उचलितां कुंथती ४
भाट तेथें वर्णिताती नामा म्हणे ज्याची कीर्ती ५

३९

तुतारे भोंबारे वाजंत्री वाजती
अप्सरा नाचती थय-थयां १
झण झणा-झण झणा झांजा गर्जताती
नोबदा वाजती धो धो धो धी २

सुरवर येती विमानाची दाटी
करिती पुष्प-वृष्टी देवावरी ३
नारद तुंबर गंधर्व किन्नर
गाती सप्तस्वर सर्व तेव्हां ४
कीर्तनाचा घोष नामाचा गजर
मृदंग सुस्वर वाजताती ५
केशराचा टीळा लावीतसे भाळा
घाली पुष्प-माळा हृजां-कंठीं. ६
घरो-घरीं नंद धाडी शर्करेसी
वस्त्रें सुहृदांसी नामा म्हणे ७

४०

ब्राम्हण आशीर्वाद देती नंदा पुसोनी नीघती १
चला चला म्हणती लोक पाहूं नंदाचें बालक २
नर नारी अलंकार शृंगारिलें हो नगर ३
दैन्य दारिद्र अपेश पळती मानुनियां त्रास ४
आणिताती बाळलेणें स्त्रिया पाहताती कृष्णे ५
नामा म्हणे पाहतां सुखं हारपली ताहन भुक. ६

४१

पाटावरी बैसविती गोपी अस्वणें करिती १
ब्रम्हा-दिक न देखति माथा त्यांसि लाविती अक्षता २
नव्हे प्राकृत बालक परस्परें म्हणती लोक ३

अपयश ,२ लग्नमुंज इत्यादि शुभ कार्यकर्त्यासदेवे ओवाळ ताततें

ध्वज[1]-अंकुश-चिन्हा आला वैकुंठींचा राणा ४
येती जाती वेळो-वेळां नामा म्हणे नीट पाहती डोळां ५

४२

द्रव्य राशि द्यावयासी नंद गेला मथुरेसी १
तेथें भेटे वसुदेव सांगीतलें गुह्य सर्व २
तई कंसाचे मानसीं घात इच्छी गोकुळासी ३
जाई जाईरे त्वरित होती गोकुळीं अघात ४
नामा म्हणे ऐसें सांगे नंद तेथुनियां निघे ५

४३

कंसें पाठविली मायावी पूतना
देवोनियां स्तना बाळें मारी १
दीन दुर्बळांचीं मारीत बालकें
करिताति शोक माय बाप २
गहिंवरोनी तेव्हां पुसे परिक्षिती
भगवंताची मूर्ती बाल-रूप ३
अभय देतसे बापा नको रडूं
तें काय घुंगरडुं मारूं शके ४
जेथें पुराणेंही वर्णिताती कृष्ण
पळती तेथून असुरादिक ५
नामा म्हणे आली नंदाचियां घरीं

[1] ध्वज (पताका) वज्र, अंकुश, इत्यादि चिन्हें ज्याचे पायावर असा.

स्वरूपें सुंदरी देवांगना ६

४४

कृष्णा लाविनसे स्तनीं निसी मारी चक्र-पाणी १

गया-भीत पाहतां प्रेत जन विस्मय करीत २

रडे तेव्हां कृष्ण-माया वांचलासी बा तान्हया ३

सख्या मिळोनी समस्त भाळिं अंगारा लाविन ४

वसूदेवें सांगीतलें नंद म्हणे तैसें झालें ५

नई कुऱ्हाडी आणिती शस्त्रें करूनी तोडिती ६

नामा म्हणे दिल्हा अग्नी वास नमाय गगनीं ७

४५

पुण्यवंता दावी बाल-लीळा देव
पालथा केशव पडे तेव्हां १

नंदें उत्सवासी केलें तेव्हां फार
दिधलें अपार द्रव्य द्विजां २

येशोदा घेतसे देवाचें चुंबन
तुजला म्हाणीन तान्ह्या माझ्या ३

चोंगाईचा मुका घेताती गौळणी
हांसे चक्र-पाणी आनंदानें ४

नाम-याचा स्वामी मंद मंद हांसे
येशोदा करितसे निंबलोण ५

४६

करावया वन-भोजन जाति गोकुळींचे जन १

तेथ भोजन करीतां कोण्ही देवा खेळविनी २

डोळे झांकून आपतां हावि निद्रेची आकृती ३

बहुत खेळलासे खेळा आतां नीजवा गे बाळा ४

वस्त्रें घालुनि शकटातळीं नीजविती वनमाळी ५

क्षण एक निजला देव रडे उठे वासुदेव ६

मुलांलागीं ह्मणे तेव्हां माझा कान्होबा खेळवा ७

रांगे रांगे मारी लात गाडा मोडोनि पडत ८

नामा ह्मणे वांटी धन नंद वांचला नंदन ९

४७

तूंचि माझा प्राण तूं माझी माउली
तूं माझी बहिणुली कान्हा बाई १

गणगोत भाऊ तूंचि माझा सखा
संसार लटीका तूज वीण २

मांडी-वरी घेत येशोदा सुंदरी
आळवीत हरी नाना-सुखीं ३

तूंचि माझा धनी तूं माझें जीवन
चुंबीते वदन वेळो-वेळां ४

नामा ह्मणे भारघाली मांडी-वरी
ठेवी भूमी-वरी कृष्णजीला ५

४८

कंसें धाडवीला तेव्हां तृणावर्त

१ गाड्याखालीं; २ प्राण.

धुळीनें समस्त व्यापियेलें ॥ १ ॥
दुष्ट-बुद्धि तेव्हां ऊचली देवासी
धरा येलें त्यांसी कंठीं देवें ॥ २ ॥
यशोदा पाहत न दिसे श्री-कृष्ण
ऊर बडवुन शोक करी ॥ ३ ॥
गौळणींचा मेळा मिळाला समस्त
कोणी कृष्णनाथ नेला सये ॥ ४ ॥
नलगे घर दार बुडाला संसार
दावागे श्री-धर तान्हें माझें ॥ ५ ॥
ठावें असतें ऐसें बांधितें पोटासीं
कोठें गुंतलासी बाळा माझ्या ॥ ६ ॥
धांवागे धांवण्या पहागे लेंकरू
शोक अनिवारु करितसे ॥ ७ ॥
शीणल्या भागल्या येतों तुझ्या घरा
सुखहें उदारा दावीं कृष्णा ॥ ८ ॥
सोडुं पाहे प्राण यशोदा सुंदरी
हंबरड्या मारी कृष्णालागीं ॥ ९ ॥
चेपोनी नरडी गत-प्राण केला
भूमीसीं पाडिला दैत्य तेव्हां ॥ १० ॥
नामा म्हणे वरी खेळत गोविंद
पाहोनी आनंद सकळांसीं ॥ ११ ॥

आला गोकुळासीं हर्ष न माय मानसीं १
नंदें गर्गातें देखिलें पूजा-स्तवनीं तोषविलें २
भूत भविष्य वर्त्तमान तुम्हा कळे हो संपूर्ण ३
यहा सामुद्रिक-लक्षण याचें काय सांगा चिन्ह ४
बोले तेव्हां गर्ग-ऋषी म्हणी कळेल कंसासी ५
रोहिणी नंदादि बैसती ऐकावया जातक चित्तीं ६
घालुनियां मंगळ स्नान आरंभी पुण्याह-वाचन ७
ऐसी वदे शुक-वाणी नामा म्हणे ऐका कानीं ८

५०

जन्म-जन्मां-तरीं झाला तूज श्रम
म्हणोनियां ब्रम्ह आलें येथें १
राखतील गाई मारतील दुष्ट
नकरी बोभाट जनामध्यें २
द्वादश-गांव अग्नी करील प्राशन
वांच-वील प्राण सकळांचे ३
चोरोनियां गाई नेईल सोंगडे
लावील हा वेड ब्रम्हयासी ४
उचलील पर्वत हरील हा गर्व
तारील हा सर्व नाम-मात्रें ५
समुद्रीं हा नगरी रचील क्षणांत
चरित्र अद्भुत करील हा ६

१ द्वारका.

सोळा-सहस्त्र शत अष्ट त्या नायिका
करील बायका तुझा कृष्ण ७
त्रैलोक्यांत हाची उदारांचा राणा
देईल ब्राम्हणा हेम-पुरी ८
सांगे ऐसें आशीर्वाद त्या देउनी
नामा म्हणे मुनी जाता झाला ९

५१

श्रीकृष्ण जन्मला वार्ताही ऐकोनी
चिंता कंसा-मनीं प्रवर्त्तली १
उद्विग्न मानसीं कंस तो बैसला
सन्मुख देखिला महाबळ २
शोधोनी त्यासीं सांगे वर्तमान
शत्रूसी जाऊन कोण मारी ३
महाबळ-दैत्य प्रतिज्ञा बोलत
शत्रूसी त्वरित मारीन मी ४
नामा म्हणे ऐसा बोलुनी निघाला
वेष धरियेला कपटाचा ५

५२

विप्र-वेष तेव्हां घेउनी निघाला
गोकुळासीं आला लगबगें १
पुत्रोत्साह कोठें लोकांला पुसत

१ यज्ञाभ्यास.

भाविक सांगत नंदा-घरीं २
ऐकोनियां ऐसें आला अकस्मात
येशोदा देखत सन्मुख त्या ३
श्रीकृष्णासी तेव्हां वो संगीं घेतलें
दंडवत केलें ब्राम्हणासी ४
सन्मुख बैसोनी वर्तमान पुसे
बाळाचें या कैसें चिन्ह सांगा ५
पंचांग ते वेळीं काढीलें कपटानीं
मान तुकावोनी पहातसे ६
नामा म्हणे मंदें पंचांग पाहून
येशोदे लागून बोलतसे ७

५३

तुझिया पुत्रासी लागलेंसे मूळ
करील निर्मूळ सर्वत्रांचें १
बाळकाचे आंगीं अवचिन्हें बहुत
नेवोनी गर्तेंत टाकीं यासी २
लोभ धरोनियां ठेवाल बाळासी
ग्रासील सर्वांसी येकदांची ३
ऐकोनी यशोदा गहिंवरोनी बोले
गर्गानें कथियेले उत्तम गुण ४
अमंगळ-वाणी पुन-रपि बोलीला

१ हालऊन, २ मूळनक्षत्र, ३ खळग्यांत.

गर्ग तों चूकला गणितासी ५
स्तन-पान करित असतां श्री-कृष्णें
मांडिलें विंदाणें. नामा म्हणे ६

५४

ठाई होनि जाती उखळें उडताती
मस्तकीं आदळती येउनियां १
पाटे वरवंटे वस्तु-मात्रालागीं
जीव त्या प्रसंगीं येता झाला २
घाबरे दुर्जन नेथुन पळो पहात
आडव्या ठाकत बाजा पुढें ३
जानवें तुटलें पंचांग फाटलें
धोत्रही गळालें ढुंगणाचें ४
पृष्ठिवरि होती बद-बदा मार
तेथुनी सत्वर पळता झाला ५
आयुष्याची बाकी कांहीं उरली होती
म्हणोनी श्री-पती सोडी तया ६
नामा म्हणे जीव घेउनी पळाला
मथुरेसी आला कंसा-पासीं ७

५५

परिक्षिती राया सांगतसे शुक.
वैकुंठ-नायक सांगतसे १

दुड दुडा पळती मुखीं लाविती माती
शेणांत लोळती दोघे जण २
नंदाच्या पुढील वोढीताती नाट
मीटक्या मट-मट मारीताती ३
कटीं कडदोरा वाकी घुंगरुवाळा
पिंपळ-पाण भाळां शोभतसे ४
देवांनें झोकिती वर्जिल्या रडती
घडी-घडी येती बिदीमाजी ५
वत्सांचिये पुच्छें बळें वोढितातीं
सोडितां न सोडिती दोघे-जण ६
विमानाची दाटी येताती सुर-वर
नाम्याचा दातार पहावया ७

५९

मृगाचिये सिंगें धरोनी नाचती
जन हांसताती खद-खदा १
भोजना बैसती. घास घेती हातीं
मांजरें देखती दुरोनियां २
गळां त्यांच्या तेव्हां धरी मेघश्याम
पुच्छ बळी राम वोढीतसे ३
यशोदा धांवत खद-खदा हांसत
गोंळणी समस्त हांसताती ४
सुरांतांची मामा चांगाई दाविती

मर्कटाचे धरिती दोन्ही कान
रोहिणीसी म्हणे दसतील बाळा ५
किती त्या यांजला सांभाळावें
पाणी उडवीती प्रतिबिंब पहाती ६
गोरस सांडिती भूमीवरी
नामा म्हणे स्वामी सर्वांचा जो साक्षी ७
धरीतसे पक्षी चुंचू वातें ८

५७

मुतूनियां हातें भूमी सारविती
पोटासी पुसीती दोघे-जण १
घेउनियां काष्ठ घासिताती दांत
वाकूल्या दावित नंदा-लागीं २
जेवितां जेवितां बाहेर पळती
श्वानासी बाहाती यू यू करुनी ३
नग्र-पुढें दोघे करीताती वाटी
घालिताती मिठी गळां त्याच्या ४
देखोनियां जन खद-खदा हांसती
यशोदे सांगती कौतुकानें ५
भिंती धरोनियां उभे राहाताती
आंधार जगतीं ज्यांचा असे ६
उभयतां जाती बिदीं खेळा-वया

१ गल्लींत.

कुरवंडी[1] काया नाम-याची ७

५८

मिळवोनी सौंगडे सांगतो तयांसी
चला गोरसासी देतों तुम्हां १
गेली असे एक गौळणी जळाला
सांगे गोपाळाला तेथें जाऊं २
न पुरेची हात दुध-शिंक्यावरी
करावें मुरारी कैसें येथें ३
पाटा-वरी पाट रची वनमाळी
पाडित डुंडुळी मोहरिनें ४
बडवोनि टीरी नाचतसे पेंदा
भुलिले गोविंदा युक्ति केली ५
उदे-झाले वेते कलुनका गल-बला
थांभालिले गोला लोणियाचा ६
कोणी पिती दूध कोणी खाती दहीं
आली लवलाहीं गौळणी ते ७
अह-निशीं धराया जपतसे तूज
जालि कैसा आज चोरटाया ८
सुरवां [illegible] पय टाकी तीच्या डोळा
नामा ह्मणे पळा सांगतसे ९

५९

---

१ वोवाळणि.

गाऱ्हाणें सांगाया आल्या गौळीच्या स्त्रिया ३१

यशोदा ऐकत पळे बाहेरी भगवंत १

एक म्हणे लोणी माझें भक्षी चक्र-पाणी २

फोडितसे भांडें वर्जिलीया म्हणे रांडे ४

गाई वासरें सोडितो येऊनी आम्हांसी सांगतो ५

अष्ट-दळ काढिलें अंगणी वरी मूते चक्र-पाणी ६

घेवोनियां आला अग्न तुझ्या घरासी लाविन ७

देईन मी तोंडावर तुझ्या बापाचें काय घर ८

घेत असे वर-खडे शिव्या देवोनियां रडे ९

देखोनियां गरोदर म्हणे केवढें उदर १०

सांगती गाऱ्हाणी नामा म्हणे ऐका कानीं ११

६०

एक म्हणे धरी स्तन याचे उपडीन कान १

तुला येईल राग आपल्या पोरां कांहीं सांग २

अंधारीं लपत पोरें करीत आकांत ३

सांगे सोसवेना कोणा खोडी नको करूं कृष्णा ४

तोंड करुनी वांकडें मुला म्हणे येथें रडें ५

देव पोरां सीकवीत गोरस आणारे समस्त ६

आम्ही निजलों समस्त काजळ मुखासी लावित ७

मेले आणुनियां सर्प माझ्या पोरां दावी दर्प[1] ८

योगीयाच्या नये लक्षा त्यासि लाऊं म्हणती शिक्षा ९

---

1 गर्व- भय.

अनंत-गाऱ्हाणीं नामा म्हणे कीर्ती वर्णी १०

६१

मुलें सांगताती माती खातो गे श्री-पती १
लाकुड घेउनी हातांत माती खातोसी पुसत २
भांबा भुललासे खरा कांप-तसे थर-थरा ३
मुख दाव उघडोनी दावी तेव्हां चक्र-पाणी ४
ब्रम्हांःडें देखीलीं नामा म्हणे वेडी झाली ५

६२

यशोदा घुसळीत स्तन मागत भगवंत १
घालोनी पदर पाजितसे जगदोद्धार २
दूध जातसे उतोन उठे कृष्णासीं टाकुन ३
मंथन-पात्रातें फोडित पळे तेथूनी त्वरीत ४
मागें धांवली यशोदा धरावयासीं गोविंदा ५
हातीं न लागे जग-जेठी नामा म्हणे होय कष्टी ६

६३

कृपा उपजली उभा राहे वन-माली १
धरूनी आणीला आजि बांधीन मी तुला २
दावें सोडोनियां बांधि-तसे देव-राया ३
फार करीतोसी खोड्या गोपीं दावीसी वाकुड्या ४
दावीं अनंत लावित दोन बोटें उणें येत ५
करीताती चोज परी नव्हेची उमज ६
श्रम-तसे वारं-वार पुरति करी जगदोद्धार ७

विष्णु-दास नामा पुढें आ.ला जेथें उभी झाडें

६४

कुबेराचे पुत्र मदोन्मत्त झाले
म्हणोनी शापिले नारदानें १
व्हाल तुम्हीं वृक्ष ऐकोनी सावध
झाला अपराध ऋषि-राया २
यमलाऽर्जुन-वृक्ष व्हाल गोकुळांत
उश्शाप वदत कृपाळु वा ३
कृष्णाचा चरण लागेल तुम्हांसी
आपुल्या स्थळासीं याल वेगीं ४
मोडितसे तेव्हां लक्ष्मीचा पती
दोघे.नीघताती दिव्य-पुरुष ५
नामा म्हणे तेव्हां करी.ताती स्तुती
पापें दग्ध होती ऐकतांची ६

६५

दामोदरा केशवा वामना देवा कृष्णा
परंज्योति नारायणा तूज नमो १
विश्व-व्यापका जनार्दना वासुदेवा निर्गुणा
अव्यया जग जीवना तूज नमो २
अनंत अवतार घेसी भक्तां-साठीं
कृपाळु जगजेठी तूज नमो ३
यज्ञेशा सर्वेशा दया निधी हृषीकेशा

पुराण पुरुषा तुज नमो ४
धन्य हा दिवस देखिले तुझे पाय
कृपावंत पाहे आम्हा कडे ५
जोडोनियां हात करितों विनंती
देई तुझी भक्ती जन्मोजन्मीं ६
करूनी नमस्कार हळु-हळु चालती
वेळो वेळां पहाती कृष्णा कडे ७
मोडतांची वृक्ष धांवोनियां येती
मग पहातांती नामा म्हणे ८

६६

समस्तां सांगती लहानाली मूलें
नवल देखिलें आम्ही आतां १
वृक्ष मूळांहुनी दोघे निघताती
पायासीं लागती कान्होबाच्या २
यशोदेचे मनीं झालासे विवेक
वैकुंठ नायक येथें आला ३
नामा म्हणे त्यासीं घातलासे माया
अपराध तयां काय असे ४

६७

नंदें सोडवीलें तेव्हां त्या कृष्णासीं
नासूंद्या गे यासी दहीं दूध १
मजला लेंकरें नाहींत गे फार

अभंग.

विश्रांतीसी थार येव्हडेंची।
निवारिलें विघ्न देवें हें केव्हडें
पडती गे झाडें याज वरी ३
आज पासुनीयां बोलसी कठीण
देईन मी प्राण तुज वरी ४
स्फुंद स्फुंद रडे तेव्हां नारायण
देई स्तन-पान.भुकेलासे ५
यशोदा आहात नये वनमाळी
धांवोनी कुर वाळी वदन त्याचें ६
समजावोनी देवा पाजितसे स्तन
घालिन भोजन नामा म्हणे ७

६८

एक गोप तेव्हां स्त्रियेसीं सांगत
सांटवीं समस्त नवनीत १
देवाचा नवस आहे पुरवणें
धरावें येथून अनसूट २
सांगोनियां ऐसें राहिला तो स्वस्थ
मागें स्त्रीनें कृत्य काय केलें ३
चोरोनियां घृत भरोनी घागरी
नेवोंनी सेजारी ठेवीयेला ४
गोळियानें तेव्हां संकल्प सोडीला

---

१ नउष्टे.

नवस फेडिला नामा म्हणे ५

६९

गोपीनें घृतासी चोरूनी ठेविलें
देवासी कळलें अंतर्यामीं १
सेजे-घरीं होतें ठेविलें चोरून
संवगडे घेऊन गेला तेथें २
ओज्य घेवोनियां गोपाळासीं देत
आपण भक्षीत आनंदानें ३
तृप्त होउनीयां गेला क्रीडायासीं
पूर्ण नव-सासी केलें त्याच्या ४
नामा म्हणे ऐसा वैकुंठ-नायक
दावीत कौतूक नाना-परी ५

७०

कांहीं एक दिवस लोटलिया वरी
गोपी तिचे घरीं प्रवेशली १
म्हणे माझा कुंभ दईवो आणून
येरीनें सदन धुंडाळीलें २
म्हणे सये येथें नाहीं तुझें घृत
ऐकोनियां मात क्रोधावली ३
चोरीं नवनीत तुझें नाहीं गेलें
माझें कांय झालें पुस तसें ४

१ नूप.

नष्टे अभिलाष केला सांग सत्य
बोलोनी निवांत राहिला ते ५
कलह करावा ऐसा त्यांचा केला
तो शिक्षा करील यथास्थित ६
न मिळे जाणोन म्हणे कृष्णार्पण
आलिसे बोलोन मंदिरासी ७
नामा म्हणे ऐक सांगे परिक्षिती
ऐशा किती ख्याती तुज सांगों ८

७१

एकदां श्रीकृष्ण खेळत असतां
प्रवेशा अर्वाचिना गोपीगृहीं १
दोन्हीं करें नेत्र चोळीतसे
गोपी पुसतसे काय झालें २
कृष्ण म्हणे माझे दुखताती डोळे
उपाय न कळे करूं काय ३
पुत्राची जननी तिचें दूध मिळे
घालितांचि डोळे बरे होती ४
गोपी म्हणे दूध देतें मी काढून
तें नेत्रीं घालोन बरे करीं ५
देव म्हणे दूध तूं काढून देसी
कैसा गुण त्यासी येइल सांग ६

१ इच्छा

माझिया करानें पिळूं देसी स्तन
तरीं येइल गुण लवकरी ७
ऐकतांची गोपी धांवे मारावया
पळे उठोनियां नामा म्हणे ८

७२

यशोदे भोंवत्या मिळाल्या गोळणी
सांगती गाऱ्हाणीं नाना परी १
गोरस भक्षोनी फोडीतो भाजन
गोकूळ सोडून जाऊं सये २
एक गोपी म्हणे माझ्या घरा येसी
बांधीन खांबासी तुज लागीं ३
यशोदेसी ऐसीं सांगुनी गाऱ्हाणीं
चालिल्या कामिनी गृहा प्रती ४
नामा म्हणे गोपी बोलिली बांधीन
तिज वरी विघ्न करी देव ५

७३

निशि प्राप्त होतां भ्रताराचे सेजे
गोपिका ती निजे आनंदानें १
संधि पाहोनियां प्रवेशला देव
करीत लाघव काय तेव्हां २
भ्रताराची दाढी कांतेची ती वेणी
एकत्र करोनी ग्रंथी देत ३

करोनि कौतुक निघोनियां गेला
अरुणोदय झाला तये वेळीं ४
गो-दोहना-लागीं गोपी ते उठत
वेणी आसडून दाढी संगें ५
भ्रतारासी तेव्हां बोले ते कामीनी
न धाय अझूनी मन कैसें ६
भ्रतारची दाढी वेणीनाची जाण
सक्रोध होऊन बोलतसे ७
रक्त होऊनियां माजली धांगडी
करिसी ओढा-ओढी मज लागीं ८
नामा म्हणे तेव्हां उठोनि बैसती
आश्चर्य करीती मना माजी ९

७४.

उभयतां तेव्हां कलह करीताती
आण वाहातातीं पर स्परें १
सोडूं जों पहाती सुंदर ग्रंथीका
न सुटे ब्रम्हा दिका कदां काळीं २
सोडितां सुटेना जाळितां जळेना
कापितां कापेना कांहीं केल्या ३
स्त्रियें लागीं तेव्हां भ्रतार बोलतू
तुज संगें मृत्यू मज आला ४
दोघेंही रडत बिदी माजी येती

कोल्हाळ करीती नये वेळीं　　५
गोकुळींचे जन डोळां पहातातीं
जाऊन सांगती नंदा लागी　　६
नामा म्हणे नंद बैसला चावडी
घेऊनी आवडी कृष्ण जीला　　७

७५

गोपी गोप तेथें पातले त्वरित
हांसती समस्त देखोनियां　　१
कृष्ण म्हणे केसी बांधिसी मजला
बांधिलें तुजला भगवंतें　　२
पायां पडतातीं रडोनी बोलती
सोडवा म्हणती आम्हा लागीं　　३
पाहोनि कींव त्यांची दया आली चित्ता
कृपेनें पहातां मुक्त झालीं　　४
नामा म्हणे तेव्हां वंदोनी देवासी
गेलीं निज धामासी आनंदानें　　५

७६

नंदाचिये घरीं चंपा-षष्ठी नेम
कुळीं कुळ-धर्म मार्तंडाचा　　१
पक्कान्नें ही नाना रोटिया भरीत
केलीं अपरमीत यशोदेनें　　२
वाघिया मुरळी सांगितलीं दोन्हीं

आला चक्र-पाणी खेळ तांची ३
माने लागीं म्हणे लागलीसे क्षुधा
धांवरे गोविंदा म्हणे माता ४
घेतलीसे आंळी करी लग बग
विस्तारिलें सांग नैवेद्यासी ५
नेवोनियां पुढें देवाच्या ठेविलें
बोलवा वहीलें अमंत्रिकां ६
तों वरी मागें भक्षी नारायण
यशोदा आपण सगावली ७
दुरळ हा देव होय आतां कैसें
मार्त्तंडाचें पिसें लागे तुज ८
करी क्षणा माजी वांकुडेंची मुख
हरिखांत विरव कालवलें ९
जाणितला भाव मायेन्चें अंतरं
करूनियां खरें दावी देव १०
पिसांच्या-सारिखं करी वेडे चार
भय वाटे फार माये लागीं ११
पूर्वी त्या सांगतां नायकरी कैसा
पुढें हा वोडसा वोढवला १२
पाचारी देवर्षी हाताविनी रूपें
नयां चिया बापें देव न निघे १३

१ आनंदांत, + हट्ट.

मंत्रुनियां पाणी आणिला अंगारा
नयाचा मानेरा केला देवें १४
नवसा न पावती कुळिच्या देवता
उपाय मागुता राहिलासे १५
चिंता वली माय मूर्च्छा आली तीसी
झाली पोर-पिसी मोह-जाळें १६
जाणोनी अंतर म्हणे कृष्णाऽर्पण
तेव्हां आलें विघ्न दूर होय १७
नामा म्हणे देवा पाहे कृपा-दृष्टीं
जाण वलें पोटीं हांची देव १८

७७

गोपिका म्हणती यशोदे सुंदरी
करीतो मुरारी खोडी बहू १
यशोदे प्रति त्या गोळणी बोलती
संकष्ट-चतुर्थी-व्रत घेई २
गणेश देईल यासी उत्तम गुण
वचन प्रमाण मानावें हें ३
गज-मुखा तेव्हां म्हणत यशोदा
माझ्या या मुकुंदा गुण देई ४
ऐसें हें वचन ऐकोनि कृष्ण नाथें
सत्य गणेशातें केलें तेव्हां ५
एक मास खोडी देवें नाहीं केली

प्रचीती ते आली यशोदेसी ६
धन्य धन्य देव गणपती पाहे
यशोदा ते राहे उप वासी ७
इंदिरा-बंधूंचा[1] उदय होऊं पाहात
यशोदा करीत पूजनासी ८
शर्करा-मिश्रीत लाडू एक वीस
आणीक बहूस मोदक ते ९
ऐसा नैवेद्याचा हारा तो भरोनी
देव्हारा नेउनी ठेवी माता १०
मातेसी म्हणत तेव्हां हर्षाकेशी
लाडु केव्हां देसी मज लागीं ११
यशोदा म्हणत पूजिन गज-वदन
नैवेद्य दाऊन देईन तुज १२
ऐसें म्हणोनीयां माता बाहेर गेली
देव्हाराजवळी हरी होता १३
एकांत देखोनी हारा उचलीला
सर्व स्वाहा केला एक दांची १४
घेउनियां ग्रास उगाची बैसला
भक्ता लागीं लीला दावी तसे १५
धूप घेऊंनीयां आली सदनांत
रिता हारा तेथें देखी येता १६

---

१ चंद्राचा,

बहूत मातेसी वाटला

बंध हरीला पूसतसे	१७

कृष्ण म्हणे सत्य वचन मानीं माते

एक-सहस्त्र येथें उंदिर आले	१८

त्यांत एक थोर होता तो मूषक

त्यावरि विनायक बैसलासे	१९

सकळीक लाडू सोंडेनें उचलीले

सर्व आकर्षिले एकदांचि।	२०

सर्वांगासीं त्यानें चर्चीला सेंदूर

सोंड भयंकर हलवीतसे	२१

उंदीर प्यासूर त्याला मी देखोनी

वचनीं वदनीं बोबडी ते	२२

न बोलवे कांहीं माझेनी जननी

क्षुधा मज लागोनी लागलीसे	२३

लाडू मज देई म्हणे जनार्दन

माता क्रोधें करून बोलतसे	२४

माता म्हणे कृष्णा पाहूं तुझें वदन

लाडू खांचि पूर्ण भक्षीयेले	२५

हरी म्हणे माते लाडू ते बहूत

मातील मुखांत कैसे माझ्या	२६

गणपति सर्व लाडू गेलासे घेऊन

आलें विहरण मज वरी २७
हरी म्हणे मज मारूं नको माते
तूज वदनातें दावितों मी २८
कृष्ण-नाथें तेव्हां मुख पसरीलें
ब्रम्हांड देखिलें मुखा माजी २९
असंख्य गणपती दीसती वदनीं
पहातसे नयनीं यशोदा ते ३०
सुखा तुज गणपती मातेसी बोलत
पूजावें त्वरीत हरी लागीं ३१
ऐसें देखोनियां समाधिस्थ होत
चहुंकडे पहात तटस्थ ते ३२
योग-माया तेव्हां हरीनें घालून
मातेपुढें जाण उभा असे ३३
यशोदा हरिसी कडे वरी घेत
मुखातें चुंबीत आवडीनें ३४
हरि घेउनियां घरांत ती गेली
भोजना बैसली नामा म्हणे ३५

७८

कोणे एके दिवशीं श्रीकृष्ण आंगणीं
विलोकी नयनीं प्रति बिंब . १
माते प्रति तेव्हां म्हणतसे हरी

१ आळ.

काढोनी झड करी देई मज ॥ २ ॥
माता म्हणे बाळा नये तें काढीतां
आणीक अनंता माग कांहीं ॥ ३ ॥
ऐसें ऐकोनियां रडतसे हरी
त्यासी नानापरी समजावीत ॥ ४ ॥
बहुत खेळणी पुढें ठेवी माता
परी तो रडतां न राहेची ॥ ५ ॥
पालखीं नेवोनी हरिसी निजवीत
यशोदा नेजात स्व-कार्यासी ॥ ६ ॥
तेचि समयीं राधा आलीसे मंदिरीं
देखिला श्री-हरी रडतां तीनें ॥ ७ ॥
पालखीजवळी जाऊनी सत्वर
घेत कडेवर हरीलागीं ॥ ८ ॥
राधा म्हणे कां तूं रडतोसी चाटा[1]
गोष्टी त्या अचाटा सांगतोसी ॥ ९ ॥
ऐसें एकोनियां उगाची राहीला
खेळवी हरीला प्रेमें राधा ॥ १० ॥
मागुती नेऊनी पालखीं घातला
रडाया लागला हरी तेव्हां ॥ ११ ॥
राधेसी म्हणत यशोदा सुंदरी
यासी क्षणभरी नेई आतां ॥ १२ ॥

---
[1] निलक्षणा.

आपुल्या मंदिरा घेउनीजा यारी
ऐकोनी मानसीं संतोषली '१३
नामा म्हणे राधा घेऊनी हरीसीं
गेली मंदिरासी आपुलिया १४

७९

मंदिरा नेवोनी पलंगीं बसवीला
म्हणत हरीला नयेवेळीं १
ऐसीया समयीं थोर तूं असती
तरी हृषीकेशी बरें होतें २
देखुनि भाव तीचा थोर झाला हरी
देखुनी सुंदरी आनंदली ३
सुख-शयनीं राधा एकांतीं असतां
अनेया[1] अवचिता आला तेथें ४
सक्रोध होऊनी बोलीला राधेसी
कोणासीं बोलसी गुज-गोष्टी ५
भ्रतारांचा शब्द ऐकतां श्रवणीं
दचकली मनीं राधिका ते ६
हात जोडोनीयां विनवी हरीसी
होय हृषीकेशी लहान आतां ७
ऐकोनी करूणा बाळ झाला हरी
दहिं-भात झडकरी ठेवी पुढें ८

---

१ राधेचाभ्रतार.

कवाड उघडोनी बोलत अनयासी
घरांत हृषीकेशी जेवीतसे ९
कावड ठेवोनी घरांत तो आला
जेविता देखीला कृष्ण नाथ १०
नामा म्हणे अनया आनंदला मनीं
हृदयीं चक्रपाणी धरीयेला ११

८०.

राधे प्रती अनया बोले तयेवेळीं
घरांत येकली असावी तूं १
येकलें हें तूज करमेना मंदिरीं
खेळावया हरी आणित जाईं २
भ्रताराचें वचन राधेनें ऐकोनी
आनंद झाला मनीं थोर तिच्या ३
स्वामि तुमची आज्ञा मज लागीं प्रमाण
म्हणोनी चरण वंदियेले ४
सुखशयनीं राधा भोगीत अनंता
गोकुळांत वार्ता प्रगटली ५
राधेचिया घरीं थोर होतो हरी
गोकुळिच्या नारी कुजबुजती ६
यशोदेसी एक सांगती सुंदरी
आवरी मुरारी आपुला हा ७
तैसेंची जाउनी राधेच्या घरासी

सांगती सासूसी तिच्या जेव्हां ८
राधेलागीं वृद्धा म्हणे तयेवेळीं
घरासीं वनमाळी आणूं नको ९
नामा म्हणे लोकीं पाडियेली तुटी
तिसीं जग जेठी अंतरला १०

८१

प्रातःकाळीं राधा उठोनीयां जाण
नंद सदनावरून पाण्या जात १
इकडे गोदोहन करितसे हरी
पाहे उभी द्वारीं राधिका ते २
विसरोनी दोहन वृषभाखालीं बसत
कृष्णजीचें चित्त वेधियेलें ३
भरणा राचवोनी[1] बाहेर आली माता
वृषभ दोहतां हरिसीं देखे ४
माता म्हणे काय करिसी घननीळा
प्रत्युत्तर तेवेळां हरी देत ५
द्वाराकडे पाहे राधेसी न्याहाळून
मातेसी वचन बोलतसे ६
भरणा भरला आतां जाई तूं घेऊन
माता क्रोधायमान झाली तेव्हां ७
कृष्णासी यशोदा म्हणे खालीं पाहे

---

[1] वोतून.

वृषभ कीं गाय दोहींतोसी ८
कृष्ण ग्वाळीं पाहे वृषभ देखिला
म्हण यशोदेला ऐक येक ९
देवाचा नवस चुकली बहुतेक
चौं थानाचें एक थान झालें १०
वचन ऐकोनी हांसत यशोदा
द्वारीं उभी राधा देखीयेली ११
कां गे येथें ऊभी घेउनी घागर
जातसे सत्वर राधा तेव्हां १२
नामा म्हणे ऐसें झालें गोदोहन
मुख प्रक्षाळून हरी जेवी १३

८२

मंथना आरंभ करितसे राधा
आठवी गोविंदा मनामाजी १
मेळवोनी मूलें खेळे तिचे द्वारीं
देखिला श्रीहरी राधिकेनें २
विसरोनी मंथन रित्या डेरियांत[1]
रवी फिरवीत गरगरा ३
डेरा खडखडा वाजतां ऐकोन
वृद्धा ते धांवोन बाहेर आली ४
सासू म्हणे काय गेले तुझे नेत्र

---

१ मार्गाच्याथाडयांत

देतसे उत्तर राधा तीसी ५
डेरा धड किंवा फूटका म्हणोनी
रवी घुसळोनी पहातसे ६
वृद्धा म्हणे तुझें चित्त नाहीं स्थीर
द्वारीं हो श्रीधर देखियेला ७
रागेंभरोनीयां बोलत म्हातारी[1]
येथें कां रे हरी खेळसी तूं ८
कृष्ण म्हणे आम्हीं खेळतों बिदीसी
तूं कां दटाविसी थेरोडिये ९
ऐसें बोलोनीयां श्रीहरी पळाला
घरासीं तो गेला नामा म्हणे १०

८३

मध्यान्ह काळीं मग हरीसी घेवोन
करीत भोजन यशोदा ते १
भोजन करूनी पलंगीं निजत
श्रीकृष्णासी घेत पुढें तेव्हां २
यशोदेसी सुख निद्रा हो लागली
राधिका ते गेली यमुनेसीं ३
नेत्रांसी पदर लावोनी रडत
अंतरीं अनंत आठवोनी ४
करुणाशब्द तीचा ऐकोनी श्रवणीं

[1] म्हातारे.

उठला चक्रपाणी तेथोनीयां ५
जावोनीयां राधा धरियेली पदरीं
निज लागीं हरी समजावीत ६
संसारासीं माझ्या पडियेलें रे पाणी
ऐसें चक्रपाणी तुवां केलें ७
ईकडे यशोदा ती जागी जंव होत
हरिसी धुंडीत तये वेळीं ८
परवां हरि हा कळी घेऊनि येईल आतां
पाहातसे माता चहूंकडे ९
पाउलांचा माग चालीलि काढीत
पावली त्वरीत यमुनातीरा १०
राधा तयेवेळीं म्हणे रे अनंता
पैल तुझी माता येत असे ११
मातेसी देखोनी गडबडा लोळत
यशोदा ते घेत कडेवरी १२
मातेसी म्हणत चोरोनी कंदुक
घेवोनीयां देख आली येथें १३
माता म्हणे कां वो यासीं रडवीसी
चेंडू तूं हरिसी देई वेगीं १४
गार्गी से मजवरी घेतो हा तुफान
मजपासीं जाण चेंडू नाहीं १५

१ खुण.

कृष्ण म्हणे माते झाडा घेई आतां
कंदुक तत्वतां निघेल पैं १६
वस्त्र जंव झाडीत राधा तयेवेळीं
पडीला भूतळीं कंदुक तो १७
ऐसें देखोनीयां राधा लज्जित झाली
हांसत वनमाळी नामा म्हणे

८४

चेंडु देखोनीयां यशोदा कोपली
म्हणे तयेवेळीं राधिकेसी १
महानष्टा तुम्ही अवघिया गोळणी
माझा चक्रपाणी ब्रम्हचारी २
इतुकें ऐकोनी राधा ते चालिली
स्वगृहासीं गेली आपुलीया ३
राधीच्या मनीं समजलें पूर्ण
ब्रम्ह सनातन श्रीकृष्ण हा ४
ईकडे यशोदा घेवोनी हरिसी
गेली मंदिरासीं नामा म्हणे ५

८५

गोकुळीं अनर्थ होताती बहुत
मिळोनि समस्त विचारिती १
वृद्ध ते म्हणती येतें आमुच्या मना
जाऊं वृंदावना सकळीक २

समस्तां मानला तयांचा विचार
निघती नारी नर शीघ्र तेव्हां ३
अहर्निशीं देवा करिती जतन
नामा म्हणे मन गोविंदीं पें

८६

विचारीत हो श्रीपती जें मी जातों वनाप्रती १
सारवावया गाई भार उतरावया मही २
एके दिनीं सायंकाळीं नंदा पुसे वनमाळी ३
उद्यां जाईन मी राना बारे घेवोनी गोधना ४
बुद्धीचा चाळक नामा म्हणे ह्याची एक ५

८७

प्रातःकाळीं मुलें येताती सकळ
उठवीं गोपाळ म्हणताती १
आळस देऊनी उठे देवराणा
बळिराम गोधना सोडी तेव्हां २
देवोनीया स्तन काकुलती येत
सांभाळा भगवंत वनामध्यें ३
जवळीच खेळा जाऊं नका दूरी
सांभाळा मुरारी प्राण माझा ४
होताती[1] उत्पात याजवरी मोठे
मोडतील कांटे सांभाळावें ५

---

१ दुश्चिन्हें.

आसनीं शयनीं भोजनीं जतन करा
नामया दातारा केशी राजा ६.

८८

चालियेले तेव्हां गडी आणि देव
खेळताती सर्व आनंदानें १
वत्साचीयां रूपें वत्सासुर आला
माराया कृष्णाला परीक्षिती २
पाहोनीयां ऐसें तयासी मारीलें
झोकोनीयां दिल्हें आकाशांत ३
चला आतां जेऊं बैसूं एके ठायीं
काढा लवलाही सिदोरीया ४
गोपाळ मिळोनी आनंदें जेवीले
ब्रम्हरसें धाले कृष्णासंगें ५
उदक प्राशन करावया आले
बकानें देखीलें कृष्णाजीला ६
दुष्टबुद्धि तेव्हां देवासी गिळीत
हृदय जाळीत उगाळिला ७
धरोनीयां हातें उभाची चिरीला
आनंद देवाला नसमाये ८
नामा म्हणे आले घरासीं सकळ
सांगताती बाळ वर्तमान . ९

८९

उठोनी प्रातःकाळीं गोळणी बोलती
जाईल श्रीपती वना आतां ॥ १ ॥
चला जाऊं त्याचें पाहूं गे श्रीमुख
हारेल ही भूक डोळीयांची ॥ २ ॥
नातरीनें येती नंदाचीया घरा
पहाती उदारा कृष्णराया ॥ ३ ॥
कुरळ हे केश सुहास्य वदन
आकर्ण[1] नयन शोभताती ॥ ४ ॥
अरुणोदयप्रभा अधर दीसती
हिरे झळाकिती दंत तुझे ॥ ५ ॥
भोंवया व्यंकेटा सुंदर नासीक
पाहोनीयां सुख फार होय ॥ ६ ॥
लल्लाटीं शोभत केशराचा टीळा
वर बिंदू रेखीला कस्तूरीचा ॥ ७ ॥
वैजयंतीमाळा कीरीट कुंडलें
नामयानें केलें निंबलोण ॥ ८ ॥

९०

उठोनी प्रातःकाळीं देवें वाजविली मुरली ॥ १ ॥
गडी मिळोनी समस्त घ्या रे सिदोऱ्या[2] सांगत ॥ २ ॥
अलंकार घालीताती दिसे सुशोभित मूर्ती ॥ ३ ॥
नामा म्हणे स्वामी माझा आला भक्तांचीया काजा ॥ ४ ॥

९१

१ कर्णापर्यंत, २ वत्र.

अनेक पुष्पांच्या साजताति माळा
गुंजा हार गळा शोभताती १
रक्त पीतांबर आरक्त अधर
चरण सुंदर चालताती २
रक्त चंदनाची घेतलीसे उटी
मयूर[1]-पत्र वेठीं शोभताहे ३
सिंगें रंगवीती देउनीयां रंग
चालत श्रीरंग मागें मागें ४
चित्तीं सर्वकाळ राहे ऐसें ध्यान
नामा म्हणे धन्य तोची एक ५

१२

शिवादिक ज्याचे वंदी पाय वनीं
पायांवरि न्हाणी यशोदा ते १
नंदपुण्य-लेखा नव्हे आम्हाप्रती
शुक परीक्षिती सांगतसे २
सनकाऽदिक ज्याचे ध्यानीं झाले पिसे
गाई चारीतसे गोकुळांत ३
गडीयासीं काला वाटीतो श्रीधर
कौतुक सुरवर पहाताती ४
नामा म्हणे सुख देईल भक्तांसी
वधील दुष्टांसी स्वामी माझा ५

१३

१ मयूरपिच्छ.

कंस धाडी अघासुर । मारि नंदाचा कुमर ॥ १ ॥
एक ओट करी खाली । दुजा मेघाचें मंडळीं ॥ २ ॥
गाई गोपाळ उदरीं । देवा कळलें अंतरीं ॥ ३ ॥
आंत प्रवेशला कृष्ण । रूप धरीत वामन ॥ ४ ॥
क्षणा ऽर्धेंची त्यासी मारी । भक्त जनाचा कैवारी ॥ ५ ॥
येथें गोपाळ पडियेले । कृपा-दृष्टीं उठविले ॥ ६ ॥
तेज अद्भुत नीघालें । कृष्ण-सुखीं प्रवेशलें ॥ ७ ॥
भक्तांसीं रक्षित । नामा म्हणे कृष्णनाथ ॥ ८ ॥

९४

गडी आणि रमा-पती । तेव्हां आनंदें जेविती ॥ १ ॥
कोण्ही मांडीनाती पानें । वरी ठेविनाती अन्नें ॥ २ ॥
कोण्ही ठेवी मांडीवरी । कोण्ही जेवी भूमीवरी ॥ ३ ॥
कोण्ही पसरीं चवाळें । कोण्ही पसरीती जाळे ॥ ४ ॥
गोळे घेवोनीयां हातीं । येर-येरानें हाणिती ॥ ५ ॥
पहाताती देव । धन्य धन्य त्यांचा भाव ॥ ६ ॥
मिटकिया देती । देवा वाकुल्या दाविती ॥ ७ ॥
माया मोही ब्रम्हादिका । नामा म्हणे तेंचि ऐका ॥ ८ ॥

९५

गोळीयाचीं पोरें । वांकुल्या दावीती
क्रोधावला चित्तीं ब्रम्हदेव ॥ १ ॥
चोरोनीयां नेत गोवत्स गोपाळ

---

१ लहान.

पाहूं योचें बळ कीती आहे २
जाणोनी अंतर देव हांसतसे
सामर्थ्य पहानसे पुत्रमाझा ३
तेथूनी आणावी होय हें उचीन
कळेल किंचित् पराक्रम ४
नामा म्हणे ऐसें विचारिलें चित्तीं
करीन श्रीपती काय तेव्हां ५

९६

गाई वत्स गोपाळ केलींरे निर्माण
नलगतां क्षण परिदर्शीनी १
पूर्ववत सर्व नून्य कांहीं नोहे
नकरी आश्चर्य मनामाजी २
इच्छा-मात्रें करी ब्रम्हांडाच्या कोटी
त्यासीं काय गोष्टी अपूर्व हे ३
सायंकाळीं गेले गोकुळा-भीतरीं
आपुलाल्या-परी घरीं सर्व ४
ब्रम्हादिकां ज्याचा नकळेची पार
मान वां विचार नकळे कांहीं ५
ऐसा हा समर्थ नामायाचा धनी
वंदी पाय वनीं सदाशिव ६

९७

¹ कृष्णाचें.

एक संवत्सर सकळ जहाला
पहावया आला ब्रम्हदेव १
पूर्ववत गाई गोपाळ देखिले
आश्चर्य वाटलें तेव्हां त्यासी २
ब्रम्हांडांत ब्रम्हा दूजा असे कोण
केलेंसे उत्पन्न याजलागीं ३
घेवोनीयां गेलों सर्व आले येथें
जावोनीयां तेथें पहातसे ४
भ्रांतीनें व्यापीलें तयाचें तें मन
देखतों मी स्वप्न किंवा सत्य ५
नामा म्हणे एके ठाई उभा राहे
त्याहाळुनी पाहे सकळांसी ६

९८

चतुर्भुज दिसती शंखचक्र हातीं
मुगुट शोभती सर्वांलागीं १
कर्णीचीं कुंडलें वैजयंती गाळा
देखतसे डोळां ब्रह्मा तेव्हां २
कौस्तुभ निर्मळ हृदयीं वत्सलांछन
बाहूचीं भूषणें पहातसे ३
चरणीं तोडर पिवळा पीतांबर
तेजें दीवाकर[1] लोपतसे ४

---

[1] सूर्य.

आपाद-पर्यंत तुळसीच्या माळा
मुद्रीका दशांगुळीं रत्नांचीया ५
केशराचे टीळे नेत्र कमळाऽकार
दंतीं इंदुकर बैसलेती ६
कोटीशा रे मूर्ती कोटि ब्रम्हे दिसती
स्तवनकरीती रूरवर ७
नामा म्हणे ऐसें दावीत गोविंद
झाळासे सावध ब्रम्हा तेव्हां ८

९९

बोळखे बापाला ब्रम्हा तेव्हां धाविन्नला १
नेत्रीं अश्रुचीयाधारा कांपतसे थर थरा २
घाली नमस्कार म्हणे अपराधी थोर ३
जोडोनीयां हात नामा म्हणे स्तुती करीत ४

१००

श्रवणें जळती पापाचे पर्वत
ऐका ब्रम्ह-गीत शूक म्हणे १
धरी जो विश्वास करी जो पठण
तरेल तो जाण भवसिंधू २
आपण तरेल नव्हे हें नवल
कुळें उद्धरतील सकळही ३
एकेक अक्षर निर्दाळी महा-पाप

१ चरणापर्यंत, २ चंद्र किरण.

करा याचा जप सात्विक हो ४
नाम घेतां धांवे अनवाणिच पायें
कोमळ हृदय कृष्णजीचें ५
विचारितां जाती कुळ अमंगळ
नविचारी काळ-वेळ धांवतसे ६
शरणांगता नेदी काळाचीये हातीं
नामा ह्मणे चित्तीं दृढधरा ७

१०१

मेघश्याम-वर्ण झालासी सगुण
कार्य आणि कारण तूज नमो १
गुंजाहार गळा मयूरपिछें वेठीं
कृपाळू जगजेठी तूज नमो २
वन-पुष्यांच्या माळा आपाद शोभती
लक्ष्मीच्या पती तूज नमो ३
वेणु वाजवीसी गाई त्या चारीसी
नकळे कोण्हासीं तुझी लीला ४
हातीं तुझ्या कवळ शोभे पीतांबर
चरण सुंदर तूज नमो ५
घेवोनी अवतार दुष्टांसीं मारीसी
भक्तांसी रक्षिसी निरंतर ६
रावण कुंभकर्ण मारिसी आत्मारामा
सोडविले आम्हा बंदिहूनी ७

तुझें मी बाळक केलें अविचारी
नामा म्हणे करी कृपा आतां ८

१०२

भव-सिंधू तराया एकची उपाय
ध्यावे तुझे पाय वासुदेवा १
गोविंद गोपाळ वाचेसीं निश्चळ
उद्धरे तात्काळ कलीमाजी २
नारायण नारायण करिजो पारायण
तो उद्धरे जाण इहलोकीं[1] ३
तु[illegible]ा यातना कर्माच्या भावना
जडजीवा उद्धरण नाम स्मरा ४
अहर्निशीं कीर्ती गाती भाविक भोळे
त्यांणीं तुज जिंकीलें ब्रम्हा म्हणे ५
नामा म्हणे ऐसें दाविलें सुगम
नलगे तुम्हा नेम नाना कोटी ६

१०३

कृष्ण-भक्ति वीण नरला आहे कोण
घ्यावा हा निवडून एक नरी १
कार्य आणि कारण लटकाची शीण
वर्म[2] न कळोन वायां गेले २
नामा म्हणे स्वामी खेचर माउली

---

१ यालोकीं, २ विकार.

कृपेनें दाविली वाट मज ३

१०४

धन्य त्या गोपीका धन्य त्यांच्या गाई
धन्य हेंची मही ब्रम्हा म्हणे १
विश्वात्मा जो हरी क्रीडे या वनांत
तृणादि समस्त धन्य धन्य २
धन्य गोवर्धन धन्य वृंदावन
वृक्षादि पाषाण धन्य धन्य ३
धन्य हें गोकुळ धन्य हे गोपाळ
व्रजवासी सकळ धन्य धन्य ४
धन्य ही यशोदा स्तन दे मुकुंदा
धन्य तूंची नंदा त्रैलोक्यांत ५
ब्रम्ह सनातन वेदासीं न कळे
गड्यां संगें खेळे अरण्यांत ६
विश्वाचा जो बाप नंद त्याचा पिता
यशोदेसी माता म्हण तसे ७
सद्गदीत कंठ नेत्रीं जळ वाहे
नामा म्हणे काय मागतसे ८

१०५

इतुकें मागतसे तुज वनीं जन्म देई मज १
सुखें करुनी राहीन तुझे पाहीन चरण २
बहुत शिणलों आतां तुजपासीं आलों ३

नकरीं आव्हेर दास तुझा मी किंकर[१]
येतों काकुळती नामा म्हणे देवाप्रती ५

१०६

काय देसील यांजला ब्रम्हा म्हणे नकळे मला १
म्हणसि देईन मी मुक्ती तरीं ऐका रमापती २
मारायासीं आले त्यासीं स्वरूपीं मिळविले ३
न फिटे याचें पुण्य. तुजवरी झालें ऋण ४
येथुनीयां नवजासी मज कळलें मानसीं ५
आणुनीयां देत गाई गोपाळ समस्त ६
घाली पोटामध्यें डोई क्षमा करीं माझे आई ७
आज्ञा घेवोनीयां गेला नामा म्हणे स्व स्थळाला ८

१०७

आनंदें खेळत राम म्हणे कृष्णनाथ १
गडी म्हणताती रामा ताडफळें देई आम्हा २
सकळ मिळोनी आले धेनुकाचे[२] वनीं ३
वृक्ष हालवोनी फळें पाडीलीं मेदिनीं ४
येत धावोनी असुर करी तयाचा संहार ५
भक्ताचा अंकित नामा म्हणे कृष्णनाथ ६

१०८

कालिंदीचे डोहीं काळीयाची वस्ती
ऐक परिक्षीती चरित्र हें १

---

१ चाकर, २ धेनुकासुराच.

यस्सि    ादांनीं सोडिलें त्या स्थळा
निघताती ज्वाळा तयाडोहीं    २
विषांचीया योगें झाडें जळताती
जीवन न घेती कोण्ही त्याचें    ३
वैकुंठ-नायक तयावनीं आला
गोपाळांचा मेळा बरोबरी    ४
हुतुतु हामामा लपनडाई खेळताती
देवासी म्हणती लपें आतां    ५
तृषाक्रांत झाले गाई ते गोपाळ
पिती तेव्हां जळ काळियाचें    ६
लहानाळीं मुलें नाहीं तयां ज्ञान
झाले गत प्राण सकळांचे    ७
नामा म्हणे तेव्हां कृपा-दृष्टीं पहात
उठवी समस्त गाई गडी    ८

१०९

जगजेठी तेव्हां क्रोधावला चित्तीं
करीन मी शांती तूझी आतां    १
माझीयां लेंकरां दीधलासी त्रास
करीन मी नाश आतां तुझा    २
त्रैलोक्यांत कोण ऐसा हा समर्थ
माझे शरणांगत मारील तो    ३
माझीया भक्तांसीं जो कां दुःख-दाय

अभंग

करीन प्रळय त्याजवरी
स्फुरताती दंड कांपती अधर
उठला सत्वर जगदीश ५
कळंबाचे वृक्षीं देव चढतसे
पीतांबर कासे खोवीतसे
जगद्गुरु तेव्हां पुष्पमाळा काढी
टाकीतसे उडी जळामध्यें ७
नामा म्हणे शोकें व्यापीलें समग्र
करूनी एकाऽग्र मन ऐका ८

११०

घालीतसे वेढे दीसतसे जळीं
आक्रांत सकळीं मांडीयेला १
गडी रडताती वत्सें पडताती
कपाळ पीटीती सकळीक २
तूजवांचूनीयां रक्षी कोण आम्हा
काय सांगूं रामा सकळीक ३
रूसलीया आमुचें कीरसी समाधान
तूजवीण वन वोस वाटे ४
आम्हा-साठीं तूवां दुष्टासी मारीले
कोण आतां लळे पुरवील ५
तुज वांचूनीयां आम्ही सर्व दीन
न जाऊं येथून गोकूळासी ६

वियोगानें तेव्हां पक्षी रडताती
आतां कृष्णमूर्ती कैंची आम्हा ७
बोठोनीयां ऐसें निस्तेज पडती
नद्या वाहताती स्थीरावल्या ८
नामा म्हणे होती दुश्चिन्हें बहूत
गोकुळीं समस्त वीचारीत ९

१११

यशोदा व्याकूळ जहालीसे प्राणें
रक्षवी असो तान्हें वनामाजी १
उठती तीडका स्तनीं माझ्या फार
लवतसे नेत्र वेळोवेळां २
जीव तळमळी दाटे माझा घांस
पाहीन पाडस केव्हां आतां ३
गोकुळींचे जन नीघाले सकळ
पहाती गोपाळ वनामध्यें ४
कालिंदीच्या तीरीं पडले सकळ
पाहोनी कोल्हाळ करीताती ५
कपाळ पीटीती यशोदा रोहीणी
आतां चक्रपाणी कैंचा आम्हा ६
धांव धांव कृष्णा दावीं रे वदना
पाजूं आतां पान्हा कोणालागी ७
तुझीया कौतुकें केंठीं मी संसार

जळतें अंतर तूज-साठीं
कोणावरी आतां घालूं मिठी
बुडालें हें घर माझें आतां
नाम्या म्हणे शोकें जाऊं पाहे प्राण
सकळांचें जीवन कृष्णनाथ १०

११२

नंद म्हणे माझें बुडालें जहाज
अभाग्यासी मज कृष्ण कैंचा १
काय माझें तप संपूर्ण सरलें
म्हणोनी बुडालें तान्हें माझें २
चिंतेनें व्याकुळ पीटी वक्षस्थळा[1]
दावा रे सावळा प्राण माझा ३
आलीयां अतीथा त्रासें दवडीलें
म्हणोनी बुडालें बाळ माझें ४
प्रातःकाळीं पाहूं कोणाचें मी मुख
येथूनीयां सुख नाहीं नाहीं ५
समस्तांची दृष्टी करी तूज कष्टी
म्हणोनी जगजेठीं टाकीयेलें ६
गोकुळीचें जन देऊं पाहे प्राण
वांचाया कारण काय आतां ७
अभय देतसे बळिभद्र सर्वांसी

---

[1] हृदयास.

येईल आतां　८
जाणें जन झाले वेडे
अतय
ना म्हणे वेदे कादीनसे　९

११३

तयाचे मस्तकीं नाचे नारायण
आरंभी गायन जगदीश　१
त्रैलोक्याचा भार घाली हृषीकेशी
दमीत दुष्टासी स्वामी माझा　२
होतां एक क्षण झाला तेव्हां क्षीण
जाऊं पाहे प्राण कालियाचा　३
तेव्हां त्याच्या स्त्रीया येती काकुलती
लक्ष्मीच्या पती कृपाळूवा　४
यज्ञेशा अच्यूता गोविंदा माधवा
दयानिधी केशवा कृष्णनाथा　५
श्रीधरा वामना अगा वासूदेवा
ऐकावी ही देवा विज्ञापना　६
आम्हालागीं आतां देई चूडे दान
धरीती चरण देवजीचे　७
दीनाचा दयाळ दासाचा कैवारी
नामा म्हणे हरी उतरला　८

११४

राहूं नका येथें जावे समुद्रासी

सांगे हृषीकेशी सकळ
तुझीया मस्तकीं असत..
न भक्षी तुज जाण पक्षीराज २
दिव्य सुमनाच्या घालीताती माळा
पूजिती सावळा बाप माझा ३
अनर्घ्य रत्नाचे देती अळंकार
श्रीमुख सुंदर पहाताती ४
जांबूनदतटीं घालीती भोजन
निघती तेथून सकळीक ५
आला भगवान आनंदले गडी
उभारिती गुढी जन तेव्हां ६
काळिया आख्यान स्मरे जो मानसीं
न डंकी तयासीं सर्पकूळ ७
अहर्नीशीं याचें करी जो पठण
नामा म्हणे विघ्न नाहीं तेथें ८

११५

आला वनमाळी मग भेटती सकळी १
यशोदा रोहिणी पोटिं धरी चक्रपाणी २
गाई धांवताती कृष्ण-आंगानें घाटीती ३
उड्या मारिताती गडी आनंदें नाचती ४
न वर्णवे तो आनंद नामयाची बुद्धि मंद ५

११६

१ गरुड, २ अमोल्य, ३ सुवर्णाच्यातटांत.

अस्तमान तेथेंची राहती
कं परिक्षीती अद्भुत तें १
निद्रेनें व्यापीलें शौनिका रे सर्वां
लागला वणवा तया वनीं २
गाई पळताती पक्षी रडताती
पिलें पडताती कृष्णापुढें ३
हाहाकार झाला धांव धांव कृष्णा
वांचवी रे प्राणा सकळांच्या ४
तुझीं आम्ही बाळें वांचवीरे आम्हा
धांव धांव रामा म्हणताती ५
आक्रोशें रडती मारिताती हाका
वैकुंठ नायका रक्षी आम्हां ६
दीनाचा दयाळ मनाचा कोंवळा
घाली अग्निज्वाळा मुखामध्यें ७
होतां प्रातःकाळ सकळ उठीले
नामा म्हणे आले गोकुळांत ८

११७

दुष्ट दुराच्यारी गोपाळाचा वेष धरी १
दैत्य वोळखिला रामें प्रलंब मारिला २
देव करिती जयजयकार पुष्पें वर्षती अपार ३
सूर्य आलासे माध्यान्हा देव पहाती भोजना ४

१ नामविशेष. (दैत्य.)

नामा म्हणे पाचारीती ग… …त्र बैसती ५

११८

एके ठाई करुनी अन्न हाते वाढी नारायण १
हें पाहोनी रूरवर चित्ती करीती विचार २
धन्य पुण्य गोळीयांचें आम्हा अन्न मीळे केंचें ३
एक असे युक्ती हात धुईल श्रीपती ४
उच्छिष्टाचे मीसें देव जळीं होती मासे ५
हें कळलें घननीळा सांगतसे हो गोपाळा ६
चला वृंदावना जाऊं नामा म्हणे उदक घेऊं ७

११९

तृणाचीया मिषें गाई गेल्या दूरी
पाचारी मुरारी नामें त्यांच्या १
चंद्रभागे गंगे भागीरथी यमुनें
येई ताम्रपर्णे धांवोनीयां २
सरस्वती प्रवरे कालिंदी नर्मदे
येई तुंगभद्रे धांवोनीयां ३
देवाजीचा शब्द ऐकोनीयां कानीं
येताती धांवोनी नामा म्हणे ४

१२०

त्रिभंगी देहुडे उभे वृंदावनीं
वेणु चक्रपाणी वाजवीतो १
तयावरी गाई टाकिताती माना
बाळें स्तनपाना विसरलीं २

सर्प आणि गरुड एकत्र बैसतां
जळेंहीं वाहातां विसरली ३
हस्ती सिंह एके ठायीं बैसताती
भ्रमर भुलती वेणुनादें ४
विंचरतां वेणी नेथें राहे फणी
करीतां भोजनीं ग्रासमुखीं ५
उदकाचे कुंभ गोपीकांचे शीरीं
यमुनेच्या तीरीं वेडावल्या ६
जह्राले तटस्थ त्रिलोकींचे जीव
वीसरला शिव देहभाना ७
नामा म्हणे व्योमीं उभ्या देवांगना
पाहोनीयां कृष्णा भुलताती ८

१२१

मार्गशीर्षमासीं कात्यायनीव्रत
कुमारी समस्त आचरती १
अरुणोदयीं येती कालिंदीचे तीरीं
गाती त्या सुंदरी कृष्णलीला २
सिकतेची मूर्ती करुनी देवीची
पूजा अर्चा तीची करीताती ३
जोडुनीयां कर करीती स्तवना
ऐकें विज्ञापना आदिमाये ४
नंदाचा नंदन देईं आम्हां पती

नामा म्हणे येती स्वस्थळासी ५

१२२

कालिंदीचे तीरीं वस्त्र ठेवीताती
जळांत रीघती सकळीक १
गड्यां समवेत आला तेथें कृष्ण
करावया पूर्ण व्रत त्यांचें २
वस्त्रें घेऊनीयां चढे वृक्षावरी
घाबरल्या नारी पाहोनीयां ३
वस्त्रें देई आतां आमुचीं मुकुंदा
जावोनीयां नंदा सांगूं आतां ४
अच्युता अनंता कृष्णा गरुडध्वजा
दासी आम्ही तुझ्या सकळीका ५
वाजतसे शीत जाऊं पाहे प्राण
यशोदेची आण तूज असे ६
ऐकोनीयां नामा म्हणे हासतसे
धर्म सांगतसे तयांलागीं ७

१२३

नग्न होऊनीयां स्नान जे करीती
त्यांचीं व्रतें होती निरर्थक[1] १
खरें करोनीयां या गे मजपासीं
सांगतों तुम्हासीं प्रायश्चित्त २

---
[1] निष्फल.

एकी आड एक गुह्यस्थानीं हात
आनंद बहुत मनामध्यें ३
करा नमस्कार सांगे वनमाळी
एक हस्त भाळीं लावीनाती ४
देवा दूजा ऐसा करितां नमस्कार
पाप याचें फार धर्मशास्त्रीं ५
ऐकोनीयां ऐसें लज्जा सोडोनीयां
पडनाती पायां आदित्याच्या ६
वस्त्रें देत तेव्हां तयां जगज्जीवन
मनोरथ पूर्ण करीन मी ७
नामा म्हणे येती गोकुळासी नारी
चालीला श्रीहरी तेथूनीयां ८

१२५

प्रातःकाळीं सांगे सकळां श्रीकृष्ण
नका घेऊं अन्न आज कोणी १
सोडोनीयां गाई चालीले वनासी
गडी हृषीकेशी खेळताती २
वर्जीयेलें आम्हा नका घेऊं अन्ना
खावें काय कृष्णा आजी आतां ३
गडीयासी सांगे वैकुंठीचा राणा
सांगावें ब्राम्हणा जावोनीयां ४
वनीं उपवासी आहे रामकृष्ण

द्यावें त्यासीं अन्न कृपाकरुनी ५
गोपाळासीं तेव्हां धाडी वासुदेव
पहावया भाव याज्ञिकांचा ६
जोडोनीयां हात वंदीनी द्वीजांसी
धाडीलें आम्हांसी कृष्णनाथें ७
नामा म्हणे ऐसें सांगती गोपाळ
याज्ञिकां सबळ अभिमान ८

१२५

पडे प्रायश्चित्त बोलूं नका कोणी
ऐकूं नये कानीं शब्द यांचा १
स्वर्ग सुखासाठीं करीताती यज्ञ
टाकिती अयदान अग्निमुखीं २
मोक्षा वर्नी आला नकळेची त्यांला
पूर्णब्रम्ह याला न जाणती ३
कृपाळु बहूत परिक्षीती राया
उद्धार कराया पाठवीले ४
इच्छामात्रें पाडी अन्नाचे पर्वत
काकुळती येत अन्नासाठीं ५
गडीयासीं कळे तेथील आकार
निघती सत्वर तेथूनीयां ६
येवोनीयां कृष्णा सांगीतलें त्यांनीं
हांसे चक्रपाणी नामा म्हणे ७

१२६

कृष्णा पांचरवाणी ऊथळ दीसती
लाहानाल्या भिंती त्याजवरी १
विस्तू घालीनाती गवत आंथरती
बडबड करीती अवघेजण २
घालुनीयां नूप हातीं घेती चाटू[1]
करीती ॐफट्‌ अस्कावेळ ३
लांकडांचें पाळें घेऊनी बैसला
मिळालासे मेळा त्याजपुढें ४
येवढेसे भांडे तांदूळ सिजवीती
तुजला काय देती त्यांतुनीयां ५
घडीघडी ऊठती घडिघडी बैसती
ते काय श्रीपती आम्हा सांग ६
काय चतुराई असे त्या गोवळा
भावासीं भुलला नामा म्हणे ७

१२७

गडीयांसी तेव्हां सांगीनलें देवें
स्त्रियांसी सांगावें जाऊनीयां १
नको कृष्णा द्विज आम्हासी मारीती
अभय श्रीपती त्यांसी देत २
खरें करुनीयां गेले स्त्रियांपासीं
सांगीनलें त्यांसी वर्त्तमान ३

१ लांकडाचा मळीसारखा असतो तो (पात्रविशेष) २ अवघावेळ.

ऐकुनीयां ऐसें उठील्या सखर
वर्जीती भ्रतार तेव्हां त्यांचे ४
एका ब्राम्हणानें स्त्रियेसीं बांधीलें
प्राणासीं सांडीलें परिसीतां ५
सकुमार सांवळा राजीव-लोचन.
पहातांता कृष्णा-मुख तेव्हां ६
आनंदाचे नेत्रीं वाहातें जीवेंन
पुरे वर्त्तमान नामा म्हणे ७

१२८

घरा जावें ऐसें सांगे पुरुषोत्तम
ऐकोनी तें श्रम फार होय १
दया-निधी ऐकें अगा मेघश्यामा
धाडूं नको आम्हा येथूनीयां २
तूजसाठीं आम्हीं सोडीलें.भ्रतारा
चरणीं देई थारा देवराया ३
देव ना संसार आम्हा झालें कृष्णा
सांगावें हें कोणा दुःख आतां ४
तुमचे भ्रतार वंदीती तुम्हाशी
सांगे हृषीकेशी भिऊं नका ५
सांगतांची ऐसें चालिल्या त्या सर्व
पहाती केशव वेळोवेळां ६

---

१उदक.

द्विजाचे मानसीं होय अनुताप[1]
निंदिताती आप आपणातें ७
भोजन करूनी गडी राम कृष्ण
निघती तेथून नामा म्हणे ८

१२९

इंद्राचा विभाग भक्षी चक्रपाणी
रूप गोवर्धनीं धरूनीयां १
क्रोधावला इंद्र गोळीयां निंदीत
दावीन सामर्थ्य तुम्हा आतां २
पोराच्या बुद्धीनें वर्त्तताती सर्व
धरूनीयां गर्व तेंची करी ३
प्रलय मेघाच्या काढील्या शृंखळा
वर्षावें गोकुळा जावोनीयां ४
आज्ञा म्हणोनीयां वंदियेला इंद्र
कोपे जेसा रुद्र प्रळयींचा ५
मुसळांच्या धारा मेघ वर्षताती
गारा पडताती शिळा ऐशा ६
मरताती पक्षी श्वापदें अपार
हिवें नारी नर कांपताती ७
नामा म्हणे गाई हंबरडा हाणीती
येऊनी पडती कृष्णापुढें ८

१३०

[1] पश्चात्ताप.

अभंग.

काकुळती येती सकळीक लोक
पहासी कौतुक काय आतां ॥ १ ॥
मागें बहुतां परी रक्षियेलें आम्हां
अगा पुरुषोत्तमा दीनबंधू ॥ २ ॥
तुजवांचोनी कोण आम्हासी रक्षीना
उदारा अनंता जगजेठी ॥ ३ ॥
शरणशरण्या अगा वासुदेवा
अच्युता माधवा दीनबंधू ॥ ४ ॥
विलंब करितां जातील रे प्राण
धरिती चरण नामा म्हणे. ॥ ५ ॥

१३१

सकळीकां तेव्हां देवें आश्वासीलें
इंद्रें हें मांडीलें विघ्न आहे ॥ १ ॥
महेंद्राचा रंक करीन क्षणांत
पहा पुरुषार्थ करीन मी ॥ २ ॥
रक्षणार यांसीं आहें मी गोविंद
उतरीन मद तुझा आतां ॥ ३ ॥
शरणागता मारी कोण ऐसा थोर
मशक पामर पाहूं आतां ॥ ४ ॥
यासाठीं करीन सृष्टीचा उभारा
लागोंनेदी वारा दुःखाचा मी
गोवर्द्धना तुम्ही चलारे सकळ

दावीतों मी बळ इंद्रा आतां
उचलीला गिरी प्रथम अंगुळीं
नामा ह्मणे बळी बाप माझा

१३२

राहा याचेतळीं आनंदें करुनी
मानूं नका मनीं भय याचें
पाहूं कीती दिवस पडतो पाऊस
धरीन निःशेष प्रळयांत
सांगतांची ऐसें राहाती सकळ
वर्णिताती बळ परस्परें
सौंगडे ह्मणती पडेल अवचीत
लावाकीं रे हात सकळीक
उगेची भ्रमती बाळकें अज्ञान
म्हणे नारायण काढा हात
सप्त दिवस होती सांगतो योगींद्र
पहावया इंद्र येताझाला
अद्भुत चरित्र पाहुनि गेली भ्रांत
मेघासीं सांगत पुरे करा
नामा ह्मणे इंद्र मनीं तो शंकला
अपराध घडला समर्थाचा

१३३

१ योग्यांत श्रेष्ठ (शुकक.)

राहीला बाऊस निघावें बाहेर
सांगे विश्वंभर सकळांसी १
दीनबंधू तेव्हां ठेवी पर्वतासी
भेटती देवासी सकळीक २
आयुष्य बहूत तुज होवो कृष्णा
बांचवीलें प्राणा सकळांच्या ३
विष्णु दास नामा वोवाळुनी जाय
येगे माझे माय भेटी देई ४

१३४

वाहातसे नेत्रीं इंद्राचीयां नीरें
अपराधी थोर देवराया १
क्षमा करीं आतां अच्युता अनंता
अगा कृष्णनाथा दीनबंधू २
तुझीया दासासीं दुःख म्यां दीधलें
भ्रांतीनें मोहीलें मन माझें ३
दावी तुज थोरी न करींच सेवा
करा दंड देवा मजलागीं ४
तूंचि माझा बाप तूंचि माझी आई
क्षमा कृष्णा बाई करीं आतां ५
दैत्य मारावया भूतळीं आलासी
भक्तांला रक्षिसी निरंतर ६

पाणी.

जगद्गुरु माझा धनी वनमाळी
जोडोनी अंजळी उभा असे ७
चतुर्भूज गळां वैजयंती माळा
पहातसें डोळां नामा म्हणे ८

१३५

गोविंदा माधवा केशवा वामना
मायाऽतीता कृष्णा तूज नमो १
गोवर्धनोद्धारा देवा विश्वंभरा
निर्गुण निराकारा तूज नमो २
जनार्दना हरी कृपाळु हृषीकेशा
पुराण पुरुषा तूज नमो ३
अव्यक्ता क्षेत्रज्ञा अचिंता कूटस्था
भूवनैक नाथा तूज नमो ४
अनंत ब्रम्हांडें तूझीये उदरीं
घनश्यामा हरी तूज नमो ५
देवराया तूझें कोमळ हृदय
कृपादृष्टी पाहें मजकडे ६
तुझा मी किंकर आहें वासुदेवा
अभय या जीवा देईं आतां ७
नामा म्हणे घाली चरणासीं मीठी

१ जगाचा एक नाथ असा.

बोले जगजेटी स्वामी माझा ८

१३६

तुझा मोडिला म्यां यज्ञ ऐक तयाचें कारण १
न करीसी स्मरण सुखाऽरूढ तुझें मन २
विसरलासीं मज अनुग्रह केला तुज ३
ऐसें सांगे नारायण नामा म्हणें समाधान ४

१३७

आणूनि सुरभी करी अभिषेक
येती सकळीक देवगण १
सुरवरांची दाटी करीती नमस्कार
होतसे अपार पुष्पवृष्टी २
वेद मंत्र घोष ऋषी करीताती
अप्सरा नाचती थईथया ३
नारद तुंबर गंधर्व गायन
वर्णीताती गुण कृष्णजीचे ४
यथाविधी इंद्र पूजी विश्वंभर
जोडोनीयां कर उभा राहे ५
आज्ञा घेऊनीयां जाय स्वस्थळासीं
येती गोकुळासीं सकळीक ६
चरित्र जो कोण्ही उच्चारील वाचे
जळती पापाचे पर्वत ते ७
नामा म्हणे ऐसें सांगतसे शुक

सूत पुराणीक शौनकासीं ८

१२८

अहर्निशीं कंस बैसे चिंताक्रांत
विचार पूसत प्रधानासीं १
प्रतिज्ञा करोनी शत्रुवधा जाती
ते मागें न येती परतोनी २
आतां पुरुषार्थी कोण पाठवावा
तो मज सांगावा निवडोनी ३
सांगती प्रधान धाडा अस्रुरास्रूर
तंव तो समोर उभा राहे ४
ह्मणे मज मृत्यु नसे कोणा हातीं
द्वापारीं मारुती गुप्त झाला ५
ऐकोनीयां ऐसें आनंद मानसीं
गौरवीलें त्यासीं नानापरी ६
नामा ह्मणे काळें बोलावीलें त्यासी
सत्वर वनासी येताझाला ७

१२९

आनंदें वनांत खेळताती गोप
गायींचे कळप चरताती १
अकस्मात दैत्य देखती दुरून
म्हणती कृष्णा विघ्न थोर आलें २
लपें तूं कान्होबा म्हणताती गडी

घालीतों घोंगडी तुजवरी ३
घाबरले तेव्हां समस्त गोपाळ
पाहोनी घननीळ बोलतसे ४
तुम्ही कांहीं चिंता न करा मानसीं
मारीतों मी यासी क्षणामाजी ५
राहोनीयां उभा पहात अंतरीं
यासीं मृत्यु कैसीं कोणाचीया ६
वातात्मजा हातीं मरण असे यासीं
कळलें देवासीं नामा म्हणे ७

१४०

गायी गोप तेव्हां लपवोनी क्षणेक
जानकी-नायक झाला देव १
आकर्ण नयन हातीं धनुष्य बाण
करीतसे ध्यान मारुतीचें २
स्वामीचा तो धांवा ऐकोनीयां कानीं
हुंदबडीला मनीं कपींद्र तो ३
निघोनी त्वरीत वनामाजी आला
चरणासीं लागला प्रेमभावें ४
म्हणे स्वामी कांहीं सेवकासी आज्ञा
करावी सर्वज्ञा दयानिधी ५
देव म्हणे बा रे काय सांगूं फार

१ हातानें, २ मारुतीच्या, ३ राम.

पैल तो असूर येत आहे ६
तुझ्या हातें असे तयासी मरण
ह्मणोनी स्मरण केलें तुझें ७
तयासीं जावोनी मारावें त्वां आतां
चरणीं ठेउनि माथा नीघाला तो ८
दुर्जनें तेवेळीं मारुती पाहीला
म्हणे काळ आला कोठोनीयां ९
धरुनीयां नरडी केला गतप्राण
पुनरपि येऊन वंदीतसे १०
नामा म्हणे दोन्ही जोडोनीयां कर
बोलिला उत्तर काय आतां ११

१४१

त्रेतायुगीं ख्याती करुनीयां थोर
वधीले असूर रावणादी १
कोणया हेतूस्तव पुन्हा आगमन
सांगा कृपाकरुन दासालागीं २
ऐकोनी वचन बोले सर्वेश्वर
द्वापारीं अवतार आठवा हा ३
तुझे भेटीस्तव रूप हें धरीलें
दावीं तें वहीलें कपी म्हणे ४
कृष्णलीला पहावी हेत आहे चित्ता
दावीं सीताकांता दीनालागीं ५

चतुर्भुज रूप दावीलें प्रकट
शिरीं मोरमुगुट शोभतसे ६

गुंजाहार गळां वैजयंती माळा
कासेसीं पींवळा पीतांबर ७

नवलक्ष गायी गोपही तीतुके
खेळती कौतुकें करोनीयां ८

नामा म्हणे तेव्हां स्तुतीनें करीत
न कळे तुझा अंत ब्रम्हादीकां ९

१४२

द्वापारींची ठेव संपूर्ण पाहून
विनवी जोडोन करालागीं १

रामरूप धरुन मज बोलवावें
तें रूप राहावें हृदयामाजी २

मनोरथ त्याचा एकोनी श्रवणीं
झाला चापपाणी तात्काळीक ३

पाहोनीयां ध्यान करूनी नमन
निघाला तेथून वायूसूत ४

घेवोनीयां आज्ञा सेतुबंधा गेला
ध्यानस्थ बैसला नामा म्हणे ५

१४३

गौळी म्हणती हृषीकेशी दावीं आपुल्या स्थळासी १

सखा सर्वां तूंचि कृष्णा आमुची पुरवावी वासना २

दावी वैकुंठ सकळां क्षण एक पहातीं डोळां ३

नामा तेथील रहिवासी आला स्थापाया भक्तांसी ४

१४४

लोपला आदित्य पडे चंद्रप्रभा

वृंदावनीं उभा सुशोभीत १

देहुडा पाऊलीं उभा तयेवनीं

वेणू चक्रपाणी वाजवीतो २

ऐकतांची नाद गोकूळींच्या नारी

पहावया हरी नीघताती ३

भ्रतार सेजेसीं टाकूनी ऊठती

वाटितां पंगती नीघताती ४

स्तन देतां बाळें टाकीली भूमीसी

मोकळीया केशीं नीघताती ५

नामा म्हणे ऐश्या गेल्या देवापासीं

आनंद मानसीं नसमाय ६

१४५

वनामध्यें कांगे आल्याती सकळ

विनोदें गोपाळ म्हणतसे १

निशीमाजी व्याघ्र फिरताती रानीं

जावें सकळांनी घरा आतां २

ऐकोनीयां ऐसें कठीण वचन

चालीलें जीवन नेत्राहूनी ३

वेणुनाद दूत धाडीला आम्हासी
आलीया म्हणसी जावें आतां ४
ब्राह्मणा चतूर आहेसी नेटका
वैकुंठनायका विचारावें ५
कामाग्नीनें कृष्णा वरीलों सकळ
मांडीयेला खेळ मन्मथाचा ६
एक एक नारी एक एक कृष्णा
करावया पूर्ण इच्छा त्यांची ७
प्रकृतीसीं ऐसा भुलला गोविंद
करीती आनंद नामा म्हणे ८

१४६

झाला अभिमान धन्य आम्ही आतां
लक्ष्मीच्या कांता भोगितसों १
गुप्तझाला तेव्हां वैकुंठनायक
करिताती शोक सकळीक २
निघाल्या तेथूनी फिरताती वनें
यशोदेचें तान्हें धुंडावया ३
वृक्षआदि पक्षी पुसती तयांसी
तुम्ही हृषीकेशी देखीयेला ४
मृगांसी पुसती देखियेला डोळां
सांगारे सांवळा कोणहीतरी ५
आम्हा वरी तुम्ही कायरे कोपतां

सांगा ना भगवंता पुसनसों ६
कुरवंडी करूं सकळांचे प्राण
देऊं त्या भूषण अंगावरलें ७
नामा म्हणे जेथें असे अभिमान
तेथें नारायण नाहीं नाहीं ८

१४७

ऐकावें चरित्र परिक्षिती राया
बरोबरी जाया एक असे १
तोडोनीयां पुष्पें करी अळंकार
घालीत श्रीधर तीजवरी २
नये क्षणभरी योगीयांचे ध्यानीं
घालीतसे वेणी आवडीनें ३
वंदीयेली शिवें चरणीची गंगा
करीतसे भांगा नीट तीच्या ४
गोपीकांच्या वेषें प्रगटल्या श्रुती
गुह्य तुजप्रती सांगीतलें ५
घेवोनीयां तीसीं गेला कुंजवना
वज्रांकुश चिन्हां उमटती ६
गोपीकांचा मेळा येतसे तांतडी
युगाऐसी घडी झाली तयां ७
नलगेची शोध शीणती सकळा

१ निंबलोण, वोवाळणी.

न जातीं गोकुळा नामा म्हणे ८

१४८

चंद्राच्या प्रभेनें चमकती पाऊलें
दुरोनी देखीलें गोपीकानीं १
कृपणाचें धन होतें जें चळलें
तयांसी लाधलें अवचिता २
एकी मागे एक धांवताती नारी
आहे येथें हरी ऐसें वाटे ३
घेऊनीयां रज लाविताती भाळा
पहाती सकळा न्याहाळुनी ४
बरोबरी नारी कोणी तरी असे
पाऊलाचे ठसे उमटले ५
पापिणी गे तुम्ही आम्ही सकळीका
पुण्याची अधिका म्हणुनि भोगी ६
बरोबरी तीसी होय अभिमान
झालांसे स्वाधीन माझ्या देव ७
कडे घेसी तरी येतें बरोबरी
चालवेना हरी मज आतां ८
जाणोनि अंतर ठकवीलें भगवंतें
नामा म्हणे तेथें रडतसे ९

१४९

मागोनीयां गोपी आल्यातीज पासीं

कोठें हृषीकेशी सांग आम्हा १
टाकोनीयां गेला मज पूतनारी
येथेंची मुरारी गुप्त झाला २
वैकुंठनायका अगा नारायणा
दावीं रे वदना एकवेळां ३
कृष्णाचें चरित्र सकळ करीती
मन रंजवीती नामा म्हणे ४

१५०

जोडोनीयां हात येती काकुलती
धाव कृपामूर्ती आम्हांलागीं १
अवतार घेसी दुष्ट वधायासी
येसी गोकुळासी म्हणोनीयां २
पाहोनीयां तुला लक्ष्मी पावली
दरिद्रें पळालीं येथूनियां ३
सकळांसी सुख द्यावया आलासी
आम्ही वनवासी दुःखी होतों ४
नामा म्हणे कंठीं धरीयेला प्राण
दाखवी चरण दयानीधे ५

१५१

सरोवरीं कमळें तैसे तुझे नेत्र
त्याहुनी विचित्र दीसताती १
कृपाळुवा ऐकें अगा हृषीकेशी

आम्ही तुझ्या दासी मोळावीणें ॥ २ ॥
कामरूप दैत्य मारीतो आम्हासी
भक्तांसी रक्षीसी निरंतर ॥ ३ ॥
दीनासी रक्षीसी दुष्टांसी मारीसी
धर्माला स्थापीसी अपेसेची ॥ ४ ॥
घेवोनीयां शस्त्र मारावें सकळां
आळासे कंटाळा नामा म्हणे ॥ ५ ॥

१५२

सुकुमार सावळीं जैसीं रातोत्पलें
दावीं तीं पाऊलें कृष्णाराया ॥ १ ॥
ध्वज वज्रांकुश पद्म तें शोभलें
दावीं तीं पाऊलें कृष्णाराया ॥ २ ॥
दडानीयां दुष्टा बाहेर काढीलें
दावीं तीं पाऊलें कृष्णाराया ॥ ३ ॥
रांगतां रांगतां यमळार्जुन मोडीले
दावीं तीं पाऊले कृष्णाराया ॥ ४ ॥
अघासुराउदरीं उभेची राहीले
दावीं तीं पाऊले कृष्णाराया ॥ ५ ॥
नामा म्हणे ज्यांतें वरुणानें पूजीलें
दावीं तीं पाऊलें कृष्णाराया ॥ ६ ॥

१५३

---

सकळांचें तुझ्या हातीं असे सूत्र
यशोदेचा पुत्र न होसील १
नंदाचिया ऋणा फेडाया आलासी
कळलें आम्हांसी तुझे रूपे २
तेहतीसकोटी देव ब्रम्हा सदाशिव
प्रार्थीताती सर्व तुजलागी ३
यादवकुळटीळका वैकुंठनायका
विधीच्या जनका भेट आतां ४
नामा म्हणे मुख दावीं कृष्णनाथा
हरेल ही व्यथा वियोगाची ५

१५४

शरणागता तारीं भवसिंधु तरीन
ठेवावा तो हात शिरावरी १
अरण्यांत दुष्ट दैत्यांसी मारीन
ठेवावा तो हात शिरावरी २
वेणु पांवा जया हातांत शोभत
ठेवावा तो हात शिरावरी ३
घेऊनी सिदोऱ्या गड्यांसी वाटीत
ठेवावा तो हात शिरावरी ४
रक्षावया व्रजा उचलीला पर्वत
ठेवावा तो हात शिरावरी ५
सुवर्णाचीं कर्णीं भूषणे असुप

पहातां निष्पाप नामा म्हणे

१५५

अभिमानें घाला घातला आम्हासी म्हणोनी लपसी देवराया १
तुजवांचोनीयां जाऊं पाहे प्राण दाखवीं वदन एकवेळां २
मुगुट कुंडलें श्रीमुख सांवळें केशरी लाविलें गंध भाळीं ३
पाहोंनीयां जीवा होय फार दुःख हारेल ही भुक डोळीयांची ४
तुजवांचोनीयां आम्हा नाहीं कोण्ही तिहीं त्रिभुवनीं नामा म्हणे ५

१५६

चरणासी शरण तुझीया जे येती तेची उतरती भवसिंधू १
लक्षूमीनें ज्यांतें असे आराधीलें ठेवीं तीं पाऊलें स्तनावरी २
आवडीने शिवें मस्तकीं वंदीलें ठेवीं तीं पाऊलें स्तनावरी ३
नामा म्हणे ऐसी करीताती स्तुती शिंपियेली क्षिती अश्रुपातें ४

१५७

आम्हावरी कां रे धरीयेला राग काय तुझें सांग आम्ही केलें १
रडनसों आम्ही मारीलसों हाका विश्वाच्या जनका नायकसी २
कामाग्नीनें आम्ही जळतों सकळ करावें शीतळ अधरामृतें ३
नामा म्हणे देई एकवेळ भेटी तूज साठीं कष्टी फार होतों ४

१५८

वाजवोनी वेणु पसरीलें जाळें आम्हासी न कळे कपटीयानें १
दुखवोनी सर्वा टांकीयेलें वनीं गेलासी वेधूनी पारधीया २
धरुनीयां धीर न रहावे कृष्णा देऊं आम्ही प्राणा सकळीका ३
सकळांच्या हत्या येती तुज वरी नामा म्हणे हरी भेटी देई ४

१५९

त्रिविध तापें प्राणी होताती संतप्त शीतळ करीत कथामृतें १
अमृता परीस तुझी कथा अधीक सांगतसे ऐक देवराया २
स्वर्गीचें अमृत प्राशन करीती पुण्य सरल्या येती मृत्युलोका ३
तुझी कथा देत अच्युत पदासी नविचारी मानसीं याती कांहीं ४
नाहीं चतुराई बोबडे हे बोल लिहित विठ्ठल नामा म्हणे ५

१६०

गाई घेवोनीयां जाई जेव्हां राना आमुचीया मना दुःख वाटे १
सकुमार सांवळीं जैसीं रातोसळें त्याहुनी कोवळे पाय तुझे २
खडे कांटे बहुत कठीण तृण मूळें ठेवीसी पाऊलें तया वरी ३
पावतोसी क्लेश अगा वासुदेवा म्हणोनीयां जीवा दुःख वाटे ४
सांगतसों आम्हीं नित्य यशोदेसी धाडूं नको यासी वनामध्यें ५
नामा म्हणे होय सकळांचा उद्धार म्हणोनी श्रीधर वना जाय ६

१६१

तूज वांचोनीयां वैकुंठनायका आम्हासी घटीका युग होय १
अस्तमान होतां येसी तूं गोकुळीं तोंडावरी धूळी गोरजाची २
कुरळ हे केश सुंदर नासीक पाहोनीयां सुख फार होय ३
लवती पापण्या न सोसति आम्हा अहर्निशीं नामा हेंची गाये ४

१६२

टांकियेले आम्ही पति बंधुसुतां आलोंत अच्युता तूज पासीं १
आमुची हीं इच्छा करिसील पूर्ण आहेसी कठीण ठावें नाहीं २
घालोनीयां कूपीं कापियेलें दोरा साधीयेलें वैरा आपुलीया ३
चरोनीयां टांकीं मोठासा पर्वत म्हणती समस्त नामा म्हणे ४

१६३

तुझे भेटी वीण जाति सकळांचे प्राण १
दया तुझ्या मना कां रे न ये नारायणा २
बोलवेना आतां कंठ शोकला अनंता ३
ऐसें प्राहोर्मीयां नामा म्हणे आली दया ४

१६४

देतसे दर्शन सकळांसी नारायण १
झाला सकळां आनंद हृदयीं धरीला गोविंद २
टाकोनीयां आह्मां कां गेलासी पुरुषोत्तमा ३
तुम्हा झाला अभिमान नामा म्हणे सांगे खुण ४

१६५

सकळांची इच्छा करीतसे पूर्ण फुलला श्रीकृष्ण त्यांच्या भावा १
वेस्मानीं बैसोनी स्करवर पहाती गंधर्व गाताती समस्वरें २
वेणे वाजताती मृदंगांचे घोष यांचा तो उल्हास वर्णवेना ३
न जाय चंद्रमा न जाती नक्षत्रें पहाती सर्वत्रें रासक्रीडा ४
जलक्रीडा करी लक्ष्मीचा पती लाळ घोंटीताती देवस्त्रिया ५
धन्य त्या गोपिका धन्य त्यांचें पुण्य भोगिताती कृष्ण पूर्णब्रम्ह ६
नामा म्हणे होय कामांची पुरती नव्हे वीर्यच्युती गोविंदाची ७

१६६

होतां प्रातःकाळ सांगतसे तयां जावें येथूनीयां शीघ्र आतां १
क्षणक्षणा पहाती देवाजीचें मुख येती सकळीक गोकुळासी २
निरक्षिती ऐकें एका कौतुकासी होत्या त्यांजपासीं त्यांच्या स्त्रीया
जाणोनीयां कोणीं नाहीं विचारीलें अंतरीं न कळे दुर्जीयाला ४

यथामती रास वर्णिला देवाचा संपूर्ण हे वाचा काय करी ५
चरित्र श्रवण करील जो कोणी धन्य तोची प्राणी नामा म्हणे ६

१६७

सरस्वती-तीरीं अंबिकेचें स्थान गोकुळींचे जन जाती तेथें १
करोनी पूजन करिती प्रार्थना नंदाच्या नंदना सुखी राखीं २
सारितां भोजन लपाला आदित्य नामा म्हणे तेथ राहताती ३

१६८

निद्रिस्थ सकळ तयेवनीं व्योळें गिळीलें सबळें नंदालागीं १
कृष्णा धांव वेगीं गिळीतसे सर्प काळावरी दर्प तुझा देवा २
माझीया पाडसा येईं बा धांवोन दाखवीं वदन तुझें आतां ३
आली काय तुज निद्रा रे कान्हया माझीया तान्ह्या ऊठ वेगीं ४
ऐकोनीयां ऐसें पहाती सकळ घालिती मूसळ सर्पावरी ५
श्रमले सकळ सोडीना नंदाला पिटी वक्षस्थळा नंदपत्नी ६
उठे जगद्गुरू काय झालें माय लावीतसे पाय तयालागीं ७
टाकियेलें सर्पे तेव्हां कलेवर पुरुष सुंदर निघतसे ८
नामा म्हणे वाचे स्तवी विश्वंभरा करूनी नमस्कारा जाता झाला[१]

१६९

करीती गायन राम कृष्ण हरी गोकुळांच्या नारी जाती तेथें १
शंखनामा तेथें आलासे गुह्यक नाहीं त्या विवेक पापियासी २
उपजला काम तयाचीया मना घालोनी विमाना स्त्रिया नेत ३
धांव धांव रामा नेतसे हा आम्हा अगा मेघश्यामा कृष्णनाथा ४

---

१ सर्पानें.

नेतो स्त्रिया काय न कळेची देवा यासी करूं घावा अपराध ५
हातीं वृक्ष दोघे ऐसे पाहोनीयां टांकोनी तो स्त्रिया पळतसे ६
घालीतांची वृक्ष प्राणासी मुकला मोक्ष त्यासी दिल्हा बळीभद्रें ७
भक्तांसाठीं मारी दुष्टा जगजेठी नामा म्हणे त्रुटि विसरेना ८

१७०

गोपीकांचा मेळा आला घराप्रती काय त्या म्हणती नंदालागीं १
परब्रम्ह साक्षात् क्षीरसागर वासी त्या कैसा धाडीसी वना मध्यें २
ब्रम्हा आणि इंद्र आले गोकुळासी वर्णिती कृष्णासी तुम्ही देखा ३
तेहातिस कोटी देव जयातें प्रार्थीत त्यासी अरण्यांत रुतती कांटे ४
दैत्याचा हा भार जहाला पृथ्वीसी वधाया कंसासी आला येथें ५
त्याज साठीं फार श्रमताती योगी कैलासाचा जोगी ध्यान करी ६
भ्रांती कां रे तूज पडली वेळोवेळां पहातोसी डोळां चरित्रास ७
नामया सुकृत झालें असे फार म्हणोनी विचार नाठवेची ८

१७१

वृषभाच्या रूपें आला अरिष्टासुर इंद्रादी सुरवर भीती जया १
बहु देतो त्रास गोकुळींच्या जना धांव धांव कृष्णा मारीं याला २
जगजेठी तेंव्हां धरीतसे सिंगें सारीतसे मागें भुजाबळें ३
पाडोनीयां खालीं दिल्हा पायवर मारीला असुर नामा म्हणे ४

१७२

कंसाचीया घरा आला नारदमुनी एकांतीं बैसोनी सांगतसे १
सातवा जो गर्भ जिराला म्हणती रोहिणी प्रसवे ती बळीरामा २
आठवा जो पुत्र देवकीसी झाला वसुदेवें नेला नंदा घरीं ३

यशोदेची कन्या घेवोनीयां येत गेली आकाशांत मारीतां मी ४
तुझीया मानसीं आशंका येईल होते रक्षपाळ माझे तेथें ५
ईश्वराची माव नकळे कोणाला कळलें मजला त्याच्या कृपे ६
घेऊनीयां शस्त्र उठीला त्वरीत करीनों मी घात वसुदेवाचा ७
तयेवेळीं म्हणे ब्रम्हयाचा सुत ऐक तूज मात सांगतों मी ८
शत्रु वधीं आधीं मग मारीं यासी आहे तूजपासीं कारागृहीं ९
सांगोनीयां ऐसें शांतवीलें त्यासी गेला गोकळासी नामा म्हणे १०

१७३

गोकुळा येऊनी भेटे नंदादिकां वैकुंठनायका सांगतसे १
कंसानें मांडिला अधर्म बहूत मारावें त्वरीत तयालागीं २
लावोनीयां आग आपण विझवीली तेचीपरी केली नारदानें ३
सांगोनीयां ऐसें वीणा सांवरोन निघाला तेथून नामा म्हणें ४

१७४

माराया कृष्णासी कंसें पाठवीला केशी १
बहु असे तो प्रतापी आला अश्वाचीये रूपीं २
देवा डसाया धांवला धरुनी पाईं झुगारिला ३
मुखीं देऊनीयां हात श्वास कोंडी जगन्नाथ ४
नामा म्हणे पडलें प्रेत हर्ष सुरवरां बहुत ५

१७५

शेळ्या मेंढियांचा खेळ आतां खेळों रे सकळ १
कोणी मेंढ्या होती कोणी चोर म्हणताती २
म्हणती रात्र झाली आतां निज वनमाळी ३

---

१ मापा.

कोणी श्वान होती चोरा डसाया धांवती ४
तेथें व्योमासुर येत. गोपाळांचा वेष घेत ५
करोनीयां चोरी. नेउनी ठेवी पर्वतदरीं ६
हें देवासी कळलें नामा म्हणे संव्हारिलें ७

१७६

कंसासुर सारे करोनी विचार धाडीतो अक्रूर गोकुळासीं १
अक्रूरा आनंद झाला असे फार पाहीन श्रीधर डोळे भरी २
आजि होइल माझ्या जन्माचें सार्थक वैकुंठनायक पाहीन मी ३
उजवे जाती काक दक्षिण करीं मृग पाहीन श्रीरंग स्वामी माझा ४
शुभ ते शकुन मार्गीं हे होतांती पाहीन भूपती वैकुंठीचा ५
येथूनी यां माझी सरली येरझार कंसानें उपकार केला मोठा ६
आजि माझे पितर उद्धरती सकळ पाहीन गोपाळ कृपासिंधू ७
नामा म्हणे आला गोकुळा सन्निध हृदयीं आनंद नसमाये ८

१७७.

चौदाजणे ज्याच्या चरणातें पूजीती त्याची घेइन माती आपुले शिरीं
एकांतीं अर्चन करितसे धुर्जटी त्यासीं बोलेन गोष्टी आवडीच्या २
सप्तऋषी ज्याचे वर्णिताती गुण करीतसे ध्यान ब्रम्हा ज्याचें ३
तेहतिसकोटी देव जयातें पूजीती श्रुती वर्णिताती गुण ज्याचे ४
चारी वेद ज्याची वर्णिताती कीर्ती करीताती स्तुती साहीजणें ५
लक्ष्मीचा पती ध्याती सनकादीक पाहीन श्रीमुख एक वेळां ६
पृथ्वीचा हा भार करावया दूर म्हणोनी अवतार घेतअसे ७

---

१ गुंहंन २ चारवेद-शिक्षादि सहाअंगे-पुराणें-न्यायआणिधर्मशास्त्र, ३ वसिष्ठादिक, ४ सहाशास्त्रें.

नामा म्हणे आला यमुने जवळीं उतरला खालीं रथाचीया ८

१७८

धन्य ही यमुना धन्य हें गोकुळ वृक्षादी सकळ धन्य धन्य १
धन्य ह्या गोपीका धन्य हे गोपाळ पक्ष्यादी सकळ धन्य धन्य २
धन्य गोवर्धन धन्य वृंदावन नंदाचा नंदन क्रीडतसे
धन्य ही यशोदा धन्य तीचा पती अखंड पहाती मुख ज्याचें ४
गायी घेवोनीयां देव गेला राना ध्वजवज्रांकुशचिन्हा उमटती ५
नेत्रीं अश्रुपात उतरे रथा खालें गडबडोनी लोळे तयावरी ६
ब्रम्हादीकां दुर्लभ येथील हे माती घेवोनीयां हातीं मुखीं घाली ७
नामा म्हणे पुढें चालिला त्वरीत देखे गडीयांत परब्रम्ह ८

१७९

तनु हें आकाश चंद्रमा तें मुख ऐसें निष्कलंक परिसीती १
पूर्णिमेचा चंद्र त्याहुनी अधीक शोभत श्रीमुख कृष्णाजीचें २
भोंवता हा शोभे नक्षत्रांचा मेळा खेळत सांवळा जगद्गुरू ३
वैजयंतीमाळा किरीट कुंडलें अक्रूरें देखीले दोघेजण ४
जोडोनीयां हात घाली नमस्कार वाहातसे नीर क्षण क्षणा ५
नामा म्हणे त्वरें धांवे हृषीकेशी धरीत पोटासीं अक्रूरातें ६

१८०

भेटि देई मज म्हणे बळिरामा नवर्णवे प्रेमा अक्रूराचा १
पेंधासी पुसती अवघे गडी तेव्हां कोण रे हा बावा आला येथें २
आपल्या कान्होबाच्या पायां कां पडतो काय हा मागतो आम्हा सांग
अक्रूर बळिराम घरीं आले गोपाळ नंदादी सकळ भेटीयेले ४

मधुपर्क विधि करीती पूजन म्हणे सु धन्यदिन आजि था हा ५
अक्रूरा बरोबरी करीती भोजन पुसे वर्तमान मग त्यासी ६
भक्त माझे देवत जगा दावी मात कृपाळु बहुन नामा म्हणे ७

१८१

प्रातःकाळीं मान झाली गोकुळांत जातो भगवंत मथुरेसी
गोळणीचा मेळा मिळाला सकळ पीटीती कपाळ आपुले हातें २
एकी त्या घालीती केसामध्यें माती एकी त्या लोळती भूमीवरी ३
आम्हा सोडोनीयां तूरे केसा जासी तुजवीण पीसीं आम्ही सर्व ४
कोणही रथा पुढें जावोनी पडती आक्रोशें रडती सकळीक ५
अक्रूर नव्हे बाई मोठा असे क्रूर नामीं निरंतर क्रिया वसे ६
अक्रूरा आम्हि सर्व पसरितों पदर नेऊंनको श्रीधर मथुरेसी ७
नामा म्हणे शोक नवर्णवे आतां झाला तो हाकीता रथवरें ८

१८२

ब्रम्हनिष्ठ नेव्हां स्थिरावला चित्तीं अक्रूराचे गळती दोन्ही नेत्र १
दही दुध तूपें भरीत्या कावडी चालती तांतडी सकळीक २
चिंतेनें व्यापीलें अक्रूराचें मन काय वर्त्तमान होइल नेणों ३
नर नारी शोक करीती सकळ दुराच्यारी खळ कंस आहे ४
मार्गीं तो स्नानासी उतरला अक्रूर रथावरी किशोर नंदजीचे ५
सोडोनीयां घोडीं चालिला तांतडी दिल्ही असे बुडी जळा मध्यें ६
दावोनी कौतुक निरसि त्यांचा धाक सांगतसे शुक परिक्षिती ७
जुंपोनीयां घोडीं चालिला सत्वर लोपे दिनकर नामा म्हणे ८

१८३

जोडोनीयां कर विनवी विश्वंभरा चलावें मंदिरा सकळीकीं १
अनाथा-वर कृपा करा कृष्णानाथा ठेवीतसें माथा पायांवरी २
मारुनीयां कंस येइन तुझ्या घरा आग्रह अक्रूरा करूंनको ३
सकळ समुदाय मथुरेचे वनीं साध्य चक्रपाणी म्हणे नामा ४

१८४

प्रातःकाळा गडा उठ कृष्ण राम पहावया ग्राम चालीयेले १
मार्गांत रजक देईना तो वस्त्रें वधी नरव शस्त्रें पापियासी २
तींगाईं वांकडी नीट केलें तीसी तिणें चंदनासी लावीयेलें ३
जोडोनीयां हात विनवीत सुदामा चला मेघश्यामा घरा माझ्या ४
वस्त्रें देती तेव्हां मथुरेचे लोक नर नारी मुरव पहाताती ५
मोडीतां धनुष्य येती रक्षपाळ नामा म्हणे रवळ वधीयेले ६

१८५

इच्छामात्रें मोडी ब्रम्हांडांच्या कोटी चालीला जगजेठी कंस द्वारा १
मदोन्मत्त हस्ती देरवोनीयां हांसे पीतांबर कासे रवोवीयेला २
सांवरोनी हातें केसा देत गांठ रवोवीतसे नीट वैजयंती ३
रवांबा टेंकोनीयां राहे पुढें ऊभा सांवळी ही प्रभा अंगकांती ४
पाहोनीयां मुरव झाला समाधिस्थ ऋषी मुनि समस्त वेडावले ५
दुष्ट पापी हत्ती घाली अंगावरी क्षणार्धेंची मारी गजालागीं ६
उपडोनीयां दांत घेतसे श्रीधर जहाला उद्धार कुवलयाचा ७
नामा म्हणे पुढें चालीला गोविंद सावध सावध परिक्षिती ८

१८६

चौदाभुवनें वसे जयाचीये पोटीं त्यासी आणी जेठी मारावया १

इंद्रादी सुरवर जयांचे किंकर त्यासि आणि पामर झोंबी साठीं २
आतुर्बळी तेव्हां दिसे नारायण जळ तसे मन वैरीयांचें ३
कंसाचे अंगणीं उभा असे देव जैसा ज्याचा भाव तैसा भासे ४
कृष्णातें देखोनी वल्गना करीती चोळीताती माती दंडालागीं ५
बळिभद्रासि खूण दावीयेली तेव्हां उसीर न लावा मारायासी ६
नामा म्हणे एक उरलासे कंस वधिती सकळांस दोघेजण ७

१८७

रमेच्या वल्लभें देखीयेला कंस धरुनी आवेश बैसलासे १
त्वरें जावोनीयां धरियेला केशीं पाडीला भूमीसी दुष्टबुद्धी २
वज्रप्राय मुष्टी वोपी नारायण सोडीयेला प्राण कंसें तेव्हां ३
देव वर्षताती सुमनाचे भार भक्त जयजयकार गर्जताती ४
ब्राह्मणें सांगती ऋषी मुनी सर्व गांताती गंधर्व समस्वरें ५
नामा म्हणे पुढें अप्सरा नाचती वर्णिताती कीर्ती कृष्णाजीची ६

१८८

राज्यीं स्थापियेला उग्रसेन तेव्हां देवकी वसुदेवा सोडवीले १
देवकीच्या स्तनीं फुटलासे पान्हा वसुदेव दर्शना करितसे २
वासुदेवें केलें त्यांचें समाधान गायी दिल्ह्या दान ब्राम्हणांसी ३
समस्तांची क्रिया करी उग्रसेन झालासे दिवान देव त्याचा ४
पळोनीया गेले होते जे यादव आणियेले सर्व राम कृष्णें ५
आनंद न माय सकळ लोकांला मथुरेंत राहीला नामा म्हणे ६

१८९

नंदालागी तेव्हां म्हणे चक्रपाणी जावें तुम्हि सर्वांनीं गोकुळासी

अहर्निशी माझें करावें चिंतन दुःख सांडी मन नंदराया २

ऐसें ऐकोनी यां निराज्ञावचन जाइल माझा प्राण तुजवीणें ३

गाई म्हणती देवा आम्हासी टाकीलें काय आमुचें सरलें पुण्य देवा

कोणासवें आम्ही खेळूं यमुनेतें रक्षील आम्हातें कोण आतां ५

ब्रम्हादीक तुझ्या वंदीताती पायां दिल्ह्या आम्ही शिव्या क्षमा करीं

यशोदेसी सांगा माझा नमस्कार देईन सत्वर भेटी सर्वां ७

कंठ सद्गदीत नेत्रीं अश्रुपात निघती समस्त नामा म्हणे ८

१९०

च्यारी वेदां ज्याच्या नयेची ऊमज करीतसे मुंज वसुदेव १

कर्दळीचे स्तंभ वाडे शृंगारीले गर्गासी धाडीलें आणावया २

देशोदेशीं चिठ्या लिहिल्या वसुदेवें मुंजीसाठीं यावें कृष्णाजीच्या

मथुरेचे लोक आणीती अहेर होतसे गजर वाजंत्र्यांचा ४

उग्रसेनें तेव्हां फोडीलें भांडार द्विजांसी अपार द्रव्य दिल्हें ५

विष्णुदास नामा वांटीतो सुपारी झाले ब्रम्हच्यारी राम कृष्ण ६

१९१

घालीतसे पंथ तरावया जना गेले संदीपना घरीं दोघे १

गुरुसेवा करीती वंदीती चरण जहाली संपूर्ण विद्या तेव्हां २

जोडोनीयां हात करीती प्रार्थना मागावी दक्षिणा गुरूराया ३

नामा म्हणे द्विज म्हणत स्त्रीयेसी असे जि मानसीं इच्छा तुझ्या ४

१९२

समुद्रांत पुत्र बुडाला रे माझा पराक्रम तुझा ठावा असे १

अवश्य म्हणोनी तेथूनी निघाले समुद्रांत आले राम कृष्ण २

करोनीयां पूजा पुसे वर्तमान देई रे आणून गुरुपुत्र ३
पांचजन्य देत्य येथें बळी राहे बंधु तेथें पाहे कृष्णनाथ ४
टाकोनीयां उडी वधीलें तयासी पाहे हृषीकेशी उदरांत ५
नाहीं ऐसें कळों आलें विश्वंभरा घेवोनी शरीरा आला तीरी ६
पशिंसितीं काय नकळे तयाला दावीतसे लीला नामा म्हणे ७

११३

यमाच्या नगरीं दोघेजण गेले शंखातें स्फुरिलें कृष्णनाथें १
ऐकोनीयां नांद कांपतसे काळ उठीले सकळ पहावया २
जोडोनीयां हात आणी अधोक्षजा करोनीयां पूजा पुसतसे ३
संदीपन पुत्र आहे तुजपासीं आणि रे तयासी शीघ्र आतां ४
तुमचा मी किंकर निरोप मज द्यावा रामा वासुदेवा पुसतसे ५
घेउनीयां पुत्र तेथूनी चालीले नामा म्हणे आले गुरुगृहीं ६

११४

कादीतसे दृष्टी संदीपन पत्नी नवर्णवे वाणीं हर्षतीचा १
असे कांहीं इच्छा मागावें आणीक दिल्हें हें बाळक म्हणती दोघे २
अहर्निशीं तुम्हा असावें कल्याण आले राम कृष्ण मथुरेसी ३
कृतांतासी धाक नामा म्हणे ज्याचा आहे मी तयाचा शरणागत ४

११५

युगा बरोबरी जातांती घटीका गोकुळींच्या लोकां तसें झालें १
उदास दीसती वनें दाही दिशा काय रे जगदीशा आम्हा केलें २
रोडावल्या गाई करीताती रुदन नकरिती स्तनपान ३
अन्न पाणी तेव्हा वर्जीती गोवळणी आतां चक्रपाणी केंचा आम्हा ४

यमुनेचे तीरीं वृक्ष ते सुकले पाषाण उलले तयादुःखें ५
प्रातःकाळीं गडी अवघेच्ची बोलती मारुनी श्रीपती गेला नाहीं
जिवनावीण मत्स्य जैसे तळमळती नामा म्हणे चित्तीं धन्य प्रेमा ७

११६

अंतर्यामी जाणे सर्वांचा जो साक्षी रडताती पक्षी मज साठीं १
पाहूनीयां प्रेमा भूलला गोविंद रडतसे मंद मंद तेव्हां २
उच्चारितां नामें तरताती पापी नविसरे गोपी कांहीं केल्या ३
विश्वाचा जो आत्मा शोक तया नाहीं भूललासे तोही भक्ति प्रेमें ४
चिंतनें व्यापीला तेव्हां हृषीकेशी पाठऊं कोणासी गोकुळांत ५
तयेवेळीं पुढें देखीलें उद्धवा बाहातसे तेव्हां तयालागीं ६
नामा म्हणे आतां करील एकांत सावधान चित्त अवधारा ७

११७

शुकादिक ज्याची वर्णिताती कीर्ती तोये काकुलती उद्धवासी १
दयेचा सागर बोले तयेवेळां मजसाठीं गोकुळां तुवां जावें २
मजवरी त्यांनीं ठेवीयेला प्राण संसाराचें भान नाहीं कोण्हा ३
यशोदा आणि नंद झालेनी तटस्थ गडि माझे समस्त पिसे झाले
गायी मजवीण नघेतीच तृण वांळें स्तनपान वीसरलीं ५
चालताना पंथ चुकति नारीनर पक्ष्यानीं आहार सांडीयेला ६
शहाणा चतूर आहेसी नेटका बोधाव्या गोपीका ब्रम्हज्ञानें ७
नामा म्हणे ठेवी चरणावरी माथा जुंपूनीयां रथा पुसतसे ८

११८

सारथ्यासी सांगे हाकी रे सत्वर पाहीयेलें तीर यमुनेचें १

भाराहूनीयां पाहे चहूंकडे बोलताती कोडें पक्षीराज २
व्याघ्र आणि गायी एकत्र बेसती कोकीळा बोलती कृष्ण कृष्ण ३
मुंगसें आणि नाग निस्तेज पडती चिमण्या बोलताती कृष्ण कृष्ण
वियोगानें तेव्हां म[illegible] र[illegible] [illegible]क बोलताती कृष्ण कृष्ण ५
कृष्णाच्या रूपेनें क[illegible]लें उद्ध[illegible]ासी धन्य धन्य त्यांसी म्हणे तेव्हां ६
ब्रम्हज्ञान सांगो देवें पाठवीला तो रडोंलागला नयेवेळीं ७
नामा म्हणे आला नंदाचीया घरा पुढील अवधारा निरोपण ८

१९९

धांवोनीयां नंदें धरीलें चरण घालूनी आसन बेसवीला १
सकुमार सांवळा राजीवलोचन सुखी आहे कृष्ण मथुरेंत २
रोहिणीचा पुत्र सुखी आहे राम स्मरे पुरुषोत्तम कधीं आम्हा ३
गोकूळांत गोळी आहे एक नंद आठवी गोविंद कधींतरी ४
काय माझें पुण्य उद्धवा सरलें म्हणोनी टाकीलें कृष्णनाथें ५
परब्रम्ह पूर्ण धाडी मी वनासी म्हणोनी हृषीकेशी कोपलासे ६
मेघश्याम-मूर्ती सकुमार पाऊलें नदेखती डोळे आतां माझे ७
ऊठ नंदा जेऊं कोण म्हणे आतां दुःख माझ्या चित्ता फार वाटे ८
नेत्रीं अश्रुधारा कंठ सद्गदीत पडीला मूर्छित नामा म्हणे ९

२००

पडीयेली जेव्हां यशोदेसी भ्रांती ऐक परिक्षिती प्रेम तीचे १
खोडी करूं नको म्हणे दटावीलें म्हणोनी रूसलें तान्हें माझें २
नंदासी म्हणत पाहू कोठें कृष्णा दाटलासे पान्हा स्तनीं माझ्या ३
उद्धव चित्तांत करीतसे खेद यशोदे सावध होई माते ४

निदर्य पापीण बांधी मी उरवळासी म्हणोनी रुसलासी देवराय
माति खातां वेळे तुज म्या मारीलें म्हणोनी टाकीलें मजलागीं ६
नामा म्हणे त्यांचें करी समाधान सांगे ब्रम्हज्ञान दोघांजणा ७

२०१

प्रातःकाळीं उद्धव स्नानासी चालीला मिळालासे मेळा गोपीकांचा
परस्परें म्हणती कोण आतां आला न्यावया नंदाला पाठवीलें २
सकळांच्या प्राणा घेऊनीयां येई म्हणोनीयां पाही धाडीयासी ३
भ्रमरांसी स्त्रीया कुशब्दें ताडीती आवडिनें बोलती नाना शब्द ४
धाउंन उद्धवाचे धरीती चरण आमुचें स्मरण करीतसे ५
स्वरूपहीन आम्ही सुंदर कंसदासी म्हणोनी तुजपासीं पुसतसों ६
आम्हांसाठीं तेथें जावोनीयां म्हण एकदां चरण दावी सर्वां ७
मेल्या त्या गोपीका त्यांची रारव झाली. वाजवीं मुरली तया जागीं ८
नामा म्हणे त्यांसी सांगे ब्रम्हज्ञान श्रीकृष्ण कृपेन स्थिरावल्या ९

२०२

समस्तांचें येणें केलें समाधान सारीलें भोजन सकळीकीं १
यशोदा आणि नंद देती अलंकार कृपादीनावर असोंद्यावी २
गोपाळ गोळणी पूसत उद्धव मीळोनीयां सर्व बोळवीती ३
पसीढबापदांसी सांगत उद्धव असोंद्यावा भाव कृष्णा-पायीं ४
आला मथुरेसी सांगे वर्तमान नामा म्हणे धन्य श्रोते वक्ते ५

२०३

अक्रूराच्या घरा आलें राम कृष्ण संतोषलें मन फार त्याचें १
घालोनी आसन प्रक्षाळी चरण म्हणे धन्यदीन आजीचा हा २

जोडोनीयां हात घाली नमस्कार जहाला उद्धार पूर्वजांचा ३
हस्तनापुरासी अक्रुरा त्वां जावें सांगीतलें देवें नामा म्हणे ४

२०४

अवश्य म्हणोनी चालीला अक्रूर पाहीयेलें पूर कौरवांचें १
धृतराष्ट्रा सांगे विदुराच्या गोष्टी फार तुझ्या पोटीं दुष्ट-बुद्धी २
बंधूच्यीया पुत्रां धरीतोसी दूर होसी लोभापर पुत्रांवरी ३
करीतोसी द्वेष पांडुच्या पुत्रांचा होसिल नरकाचा अधिकारी ४
स्वर्गींचे पूर्वज हांसतील तुज धरावा ऊमज येथोनीयां ५
सांगुनीयां ऐसें तेथोनी निघाला कुंतीघरीं भेटला नामा म्हणे ६

२०५

देवकी रोहिणी बळिराम वसुदेव सरवें सुखी सर्व आहेत कीं १
पाहोनीयां तूज झालें समाधान सुखी आहे कृष्ण मथुरेंत २
आम्हु ची एक कुंती आहे हस्तनापुरीं स्मरे तो अंतरीं किंवा नाहीं ३
बहुतां दिवसां तुज धाडीलें अक्रूरा म्हणोनी अंतरा करवेनाचे ४
माझीया बाळासी फार देती दुःख नाहीं मज सुख क्षणभरी ५
राजा पंडु आम्हा टाकोनीयां गेला रक्षी बाळकांला कोण आतां ६
नामा म्हणे ऐसें सांगतसे कुंती सिंपीतसे क्षिती अश्रुपातें ७

२०६

निरोप हा माझा सांग रे कृष्णाला भरवंसा मजला आहे तुझा १
अच्युता अनंता श्रीधरा वामना अगा नारायणा शरण तूज २
जनार्दना हरी त्रिविक्रम केशवा अगा वासुदेवा शरण तूज ३
गोविंदा माधवा हरि मेघश्यामा अगा पुरुषोत्तमा शरण तूज ४

चक्रपाणी अगा वैकुंठनायका रक्षीं या बाळकां दासां तुझ्या ५
त्रिविधतापें माझी जळतसे काया दावी मज पाया एक वेळां ६
विदुर अक्रूर करिती समाधान करावें श्रवण नामा म्हणे ७

२०७

परब्रह्म पूर्ण तुझा आहे सखा मानिसी कां दुःख जननीये १
इंद्राचा अवतार आहे हा अर्जुन घेईल हा प्राण कौरवांचे २
करीलगे युद्ध धरुनीयां धीर न देखे मी वीर त्रैलोक्यांत ३
सांगोनीयां ऐसें पुसोनी सर्वांसी आला मथुरेसी नामा म्हणे ४

२०८

समाप्त.

